






नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुररस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# *अनुक्रमणिका*

# महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका


## मिटल्या नयनीं भुवनें सुन्दर

[ जाति– पादाकुलक ]

पडलों अरतां मिटून डोळे
अमर्याद किति विश्व निराळें
   मिटल्या नयनीं होतें विकसत
सौन्दर्यानें मुसमुसलेलें.

दुनिया रंगी-बेरंगी ती
गोचर होअी असुनि निराकृति
आला होता अैन भरातें
खेळ पाठशिवणीचा तेथे.

चौकोनावर त्रिकोन वर्तुळ
हिरवे पिवळे सुनील श्यामल,
त्यांत लवलवे वीज-शलाका
सरकुनि जाअी मेघ-मालिका;
अेकसारखीं भुवनें अैशीं
प्रगटुनि होतीं जात लयासी.

बहिर्गोल ह्या भूपृष्ठावर
धावत सुटतां वाहन-माला
अेक अेक तीमधील पुढचें
   जेंवि दृष्टिच्या पल्याड जाअी,
   मिटल्या नयनीं असेंच कांही
   अेकसारखें लोपत राही.

विविध छटांच्या झोत द्युतिचे
सरसावति ते अष्ट दिशांतुन,
जणु टिपऱ्यांचा खेळ खेळती,
की तेजाचे गोफ गुंफिती,
झाल्या की परिरंभण-निरता
प्रेमनिर्भरा अुत्कट सरिता,
अद्‌भुत रंगुन धमाल अैशी
बघतां बघतां जाअि लयासी.

मिटल्या नयनां पुन्हा चोळुनी
बघूं लागतां मिटल्या नयनीं
दृश्य अुमलतें दिव्य निराळें
जया न बघती अुघडे डोळे.

थेंब ठिबकती अेकीकडुनी
तमःशिलेवर फुटतां पडुनी
थेंबाथेंबागणिक अुसळुनी
लोळ दीप्तिचे चढती गगनीं,
लोकाग्रणिचे बोल ज्यापरी
स्फोट पावती जनहृत्कुहरीं.

मिटल्या नयनां चोळुनि बघतां
दृश्यामाजी प्रगटे नवता.
नेत्र-दलें तर सान शिम्पले
परंतु त्यामधि अथांग डहुळे
दों बाजूंला वा खालीवर
सताल नीरव कसला सागर,
तुफान लाटा—पंखचि की ते
विश्वव्यापी क्रान्ति पसरिते.

मिटल्या नयनां बघतां चोळुन
पुन्हा येअि नव दृश्य अुफाळुन;
चूर्ण गुलालासम सोन्याचें
   मुठीमुठींनें कोणी अुधळी,
जगदुद्धारक की पुरुषोत्तम
   होअि फिरुन अवतीर्ण भूतळीं,
म्हणून जन्मोत्सवीं तयाच्या
   दंगल होती अशी चालली.

शत पैलूंच्या भिंगामधुनी
   अेकचि वस्तू हो शतगुणिता,
परि प्रकाशाशिवाय कुठुनी
   नेत्रा भिंगा ती दृक्क्षमता ?

मिटल्या नयनीं मात्र मराभर
अनन्त फुलतीं भुवनें सुन्दर.

—यशवन्त

पुणें,
५–१२–४५

# महाकाव्याची अनिर्मिति कां ?

लेखक गं. ब. ग्रामोपाध्ये

अर्वाचीन काळांत काव्याच्या स्वरूपांत आणि स्वभावांत अनेक परिवर्तनें झालीं आहेत. तीं समाधानकारक वाटोत न वाटोत, परंतु अेके काळीं उत्कृष्ट प्रकारचीं महाकाव्यें लिहिलीं गेलीं, तशीं अलीकडे लिहिलीं जात नाहीत खरीं. ही गोष्ट मराठी काव्यापुरतीच नव्हे, तर साधारणतः सर्वच भाषांतील काव्याबाबत म्हणतां येते. महाकाव्याच्या अनिर्मितीचीं अनेक कारणें टीकाकारांकडून पुढे केलीं जातात. त्यांत परिस्थिति हें एक प्रमुख कारण मानलें जातें. प्राचीन काळीं महाकाव्यें लिहिलीं गेलीं, तेव्हा महाकाव्यानुकूल अशी परिस्थिति होती, तशी आज नाही असा त्यांच्या म्हणण्याचा आशय असतो. परंतु महाकाव्यांच्या अितिहासांत याला आधार मिळेल असें वाटत नाही. होमर, व्हर्जिल, मिल्टन किंवा आपल्याकडील व्यास, वाल्मीकि, कालिदास, भारवि अित्यादि महाकवींनी आर्ष किंवा अभिजात महाकाव्यें लिहिलीं, त्या साऱ्यांच्या वेळची परिस्थिति अेकसारखीच होती किंवा महाकाव्यानुकूलच होती असें खास म्हणतां येणार नाही. परंतु त्यांनी महाकाव्यें लिहिलींच. तेव्हा आजच्या परिस्थितींतहि महाकाव्य कां लिहिलें जाअूं नये असा प्रश्न साहजिकच पुढे येतो.

या विषयाचा विचार करतांना मराठींतील टीकाकारांनी जीं कांही कारणें सुचविलीं आहेत, त्यांचा विचार प्रथमतः करणें जरूर आहे. प्रो. वा. म. जोशी म्हणतात, "अलीकडे बाह्य परिस्थितीमध्ये स्थिरता आणि निश्चितता आली आहे, पण अंतःसृष्टि ढासळत आहे... सर्व कल्पना संशयास्पद झाल्या आहेत... सध्याच्या काळीं आपली अशी मनःस्थिति झाली आहे की आपली कशावर श्रद्धा बसत नाही... सर्वत्र अनिश्चय, संशय, ढिलेपणा, गुळमुळीतपणा, चालढकलपणा दिसत आहे." (विचारसौंदर्य पृ. १०-११). वामनरावजींच्या या मीमांसेचा एकंदर रोख आधुनिक काळांतील श्रद्धाहीनतेकडे आहे. आधुनिक कालांत जीवनांतील मूल्यें बदललीं आहेत. राजकीय, धार्मिक, सामाजिक अित्यादि सर्वच क्षेत्रांत संशयवाद माजूं पाहात आहे. या संशयवादामुळे कोणतीहि भावना उत्कटत्वाला पोहोचूं शकत नाही; विकारांचीं वादळें अुठूं शकत नाहीत; आणि म्हणून महाकाव्यें लिहिलीं जात नाहीत.

प्रा. रा. श्री. जोग यांनीहि या विषयाचा विचार करतांना (प्रदक्षिणा पा. ३१) आधुनिकांच्या मनोवृत्तीकडेच मुख्यत्वें बोट दाखविलें आहे. ते म्हणतात, "जिव्हाळा वाटण्याजोगें असें आधुनिकांना कांहीच दिसत नाही.... कोणत्याहि गोष्टीसंबंधाने जिव्हाळा वाटणें ही गोष्टच मुळी हास्यास्पद होअून बसली आहे. बुद्धिप्रामाण्यवाद म्हणजे कोणत्याहि गोष्टीच्या चांगुलपणावर विश्वास नसणें असा अर्थ झाला आहे... सर्व-तुच्छ-वादाचेंच प्राबल्य माजलें आहे... बुद्धिप्रामाण्याने सर्वच बाबतींत साशंकतेची वृत्ति आपणांस शिकवली आहे; पण विचाराने आपण जेथवर जाअूं शकूं त्यावर तरी खरी श्रद्धा ठेवून असावें हें मात्र शिकविलें नाही." अशा तऱ्हेची बौद्धिक अराजकतेची स्थिति असल्याकारणाने महाकाव्याची निर्मिति होअूं शकत नाही.[1]

प्रा. वा. म. जोशी व प्रा. रा. श्री. जोग यांचें वर अुल्लेखिलेलें अनुमान तपासून पाहतां त्यांत अेका दृष्टीने थोडेसें सत्य आहे असें म्हणावें लागतें. कारण पाश्चात्य आणि पौरस्त्य महाकाव्यांत या अनुमानाला पोषक असे कांही आधारहि सांपडूं शकतात. होमरने अिलियड, ओडेसी हीं महाकाव्यें

१. ही चर्चा महाकाव्याविषयीं विचार करतांना केलेली नाही. अेकंदर काव्यविषयींच्या अनास्थेचा विचार प्रस्तुत होता त्या निमित्ताने आली आहे. —सं०

लिहिलीं, तेव्हा ग्रीसमध्ये वीरयुग चालू होतें. मानवी जीवनावर अतिमानुष शक्तीचें प्रबळ स्वामित्व असल्याची त्या काळीं प्रगाढ श्रद्धा होती. अतिमानुष आणि दैवी शक्तींशीं झुंज देणाऱ्या झुंजाराबद्दल आणि त्यांच्या शौर्यवीर्याबद्दल लोकांत असीम आदर होता. त्या झुंझारांनी घातलेल्या रणसंग्रामांचीं वर्णनें गाण्यांत आणि ऐकण्यांत लोक देहमान विसरून जात. ट्रॉयच्या परिसरांत रणचंडीने घातलेलें भीषण तांडव आणि ॲचिलिसच्या भीमपराक्रमामुळे झालेलें हत्याकांड यांच्यामागे नियतीचा हात असल्याची त्या काळीं खात्री होती. विश्रब्धपणें घरीं परतणारा ओडेसिअस केवळ ग्रीक देवतांच्या असहिष्णु कोपामुळे देशोधडीला लागला. देवतांच्या अतिमानुष सामर्थ्यांइतकाच महावीरांच्या सामर्थ्यांने तो काळ मारला गेला होता, म्हणूनच होमरने ईलिअडच्या सुरुवातीस

"Wrath of Achilles, oh heavenly Goddess sing"

अशी प्रार्थना केली, आणि आपल्या महाकाव्याच्या नायकाचा, त्याच्या शौर्यवीर्याचा आणि पर्यायाने काव्याच्या विषयाचा उल्लेख केला. ओडेस्सीची सुरुवातहि त्याने "Tell me muse, of that man so ready at need, who wandered far and wide...." अशीच केली. व्हर्जिलने Æneid लिहिलें त्या काळींहि रोमन संस्कृति एका विशिष्ट बिंदूला पोहोंचली होती; आणि त्या संस्कृतीबद्दल आदर आणि श्रद्धा व्हर्जिलच्याहि मनांत पूर्णपणें मुरली होती. ट्रॉय शहराचा पाडाव होतांच व्हर्जिलचा ॲनिअस आपल्या वास्तुदेवता हृदयाशीं कवटाळून आणि आपल्या वृद्ध पित्याला पाठकुळीं घेऊन जो निसटला तो थेट इटलीला आला व त्याने रोमची स्थापना केली. व्हर्जिलला 'रोमन व्हर्जिल' म्हणून Wordsworth ने संबोधलें आहे तें एवढ्याचसाठी. महाभारत आणि रामायण यांतूनहि अशा तऱ्हेची साक्ष काढतां येईल. व्यासांनीहि नमनाच्या श्लोकांत नरनारायणाचा उल्लेख करून पांडवांचा विजय हाच भारताचा विजय असल्याचें सांगितलें आहे. कुरुक्षेत्रावर कौरवपांडवांनी घातलेल्या संगरतांडवावरच महाभारताची उभारणी आहे. महाभारतकाळीं सत्य आणि धर्म यांवरची श्रद्धा पराकोटीला गेलेली होती. या श्रद्धेपायीं धर्मपत्नीलाहि पणाला लावून वनवास पत्करण्याची तयारी धर्माने केली. वाल्मीकीच्या रामाने वडिलांना वचनपालन करतां यावें म्हणून बालवयांत वनवास पत्करला; आणि भरताने सत्यासाठी आणि न्याय्य हक्कासाठी कैकेयीचा धिक्कार करून चालून आलेल्या राज्यावर पाणी सोडलें.

वीरवृत्ति, धर्म, सत्य किंवा संस्कृति यांवरची निष्ठा ज्या वेळी पराकोटीला गेली होती, त्या वेळीं होमर, व्हर्जिल किंवा व्यासवाल्मीकि यांसारखे कवि झाले आणि म्हणून अशा तऱ्हेची परिस्थिति असेल तरच महाकाव्याची निर्मिति होईल असा आशय प्रा. जोशी व प्रा. जोग यांनी व्यक्त केला असावा. या दोघांच्या मतें आधुनिक काल हाच महाकाव्याला अनुकूल नाही, आजच्या अश्रद्धेच्या युगांत महाकाव्याला पोषक अशा लोककथांवरील समाजाचें लक्ष उडालेलें आहे. विकारप्रधान वीरवृत्तीबद्दल आदर ओसरलेला आहे. देवाधर्मांवरची आस्था उडालेली आहे. खुद्द जीवनावरचीहि निष्ठा भंगलेली आहे. कोणत्याहि गोष्टीचें माहात्म्य वाटणें हेंहि कमीपणाचें वाटत आहे, आणि म्हणून आज महाकाव्याची निर्मिति होण्याची शक्यता नाही.

महाकाव्याच्या अनिर्मितीची वरील मीमांसा मान्य करण्यापूर्वी महाकाव्यांच्या आधारें आणखीहि कांही उलटसुलट अनुमानें निघूं शकतात का हें पाहणें अगत्याचें आहे. काल निरवधि आहे व पृथ्वी पण विपुला आहे. एका काळीं किंवा एका स्थळीं जी परिस्थिति होती, तीच किंवा तशीच परिस्थिति सर्व स्थळीं आणि सर्व काळीं असेलच असें म्हणतां येणार नाही. होमरच्या काळीं विकारप्रधान वीरवृत्तीचें माहात्म्य, देवतांच्या अतिमानुष कर्तृत्वावर श्रद्धा आणि लोककथांबद्दल अवीट गोडी होती. तशीच स्थिति व्हर्जिलच्या काळींहि होती. परंतु होमर ग्रीक, तर व्हर्जिल रोमन. होमरने ग्रीक लोकांना इलिअड, ओडेस्सी पुरवलीं, तर व्हर्जिलने रोमन लोकांना ॲनिड सादर केलें. ग्रीक वीरयुग आणि महाभारतीय वीरयुग यांत कांही बाबतींत

साम्य असल्यासारखें वाटलें, तरी अेकंदर परिस्थितींत पुष्कळच फरक होता. महाभारतकालीं वीर-वृत्तीचें माहात्म्य होतें. परंतु ती वीरवृत्ति सत्य आणि धर्म यांच्या पालनाकरिता असेल तरच. गंधर्व, किन्नर, अिंद्रादि देव, किंबहुना ब्रह्माविष्णुमहेश, यांचा मानवी जीवनावर अधिकार गाजत असला, किंवा मानवी जीवनांत प्रसंगीं ते स्वतः भाग घेत असले, तरी ग्रीक दैवतांपेक्षा भारतीय दैवतांत जास्त देवपणा होता. पॉसिडॉन (Posoidon) या सागरदेवतेच्या मुलाचा– Polyphemus चा– डोळा ओडेसिसअसने फोडला म्हणून पॉसिडॉनने ओडेसिसअसला शाप देऊन देशोधडीला लावलें. ('alone, in evil case, to find troubles in his house.') भारतीय देवहि शाप देत, पण लागलीच त्यांच्याजवळ अुश्शाप तयार असे. आपल्या भक्ताकरिता त्याच्या प्रतिस्पर्ध्याला त्रास देतांनाहि त्यांना त्याची जाणीव असे; आणि प्रसंगीं ते त्याची भरपाअीहि करीत असत. अिंद्राने कर्णाचीं कवचकुंडलें मागून घेतलीं, पण लगेच त्यामुळे संतुष्ट होअून त्याला अमोघशक्ति दिली. जशी भारतीय देवतांची मानवांसंबंधीची दृष्टि ग्रीक देवतांच्या दृष्टीपेक्षा निराळी होती, तशीच भारतीय मानवांची जीवनाबद्दलची दृष्टि ग्रीकांच्या दृष्टीपेक्षा निराळी होती. स्वप्नांत दिलेलें वचन पाळण्यासाठी हरिश्चंद्राने स्वतःला डोंबाघरीं विकून घेतलें. सत्याकरता आणि धर्मपालनाकरता पांडवांनी चौदा वर्षे वनवास पत्करला. सारांश, देशकालपरिस्थिति बदलतांच जीवनमूल्येंहि बदललीं होतीं. हेलन आणि द्रौपदी यांच्या स्वभावांतून किंवा अचिलिस, ओडेसिअस, मेनिलॉस अित्यादि ग्रीक वीरपुरुष आणि युधिष्ठिर, भीम, अर्जुन, कर्ण, भीष्म, द्रोण अित्यादि भारतीय महापुरुष यांच्या स्वभावांतून हा वर अुल्लेखिलेला फरक स्पष्ट होअील.

होमर आणि व्यास यांच्या आर्ष महाकाव्यांवरून महाकवींना महाकाव्य लिहिण्यासाठी कांही विशिष्ट श्रद्धायुक्त परिस्थिति असावी लागते अशी जी समजूत झाली आहे, ती तदनंतर निर्माण झालेल्या महाकाव्यांवरून बरोबर आहे असें मानतां येत नाही. मिल्टन्‌ने आपलें Paradise Lost हें महाकाव्य लिहिलें, त्या वेळीं होमरच्या किंवा व्यासाच्या काळची परिस्थिति अिंग्लंडमध्ये होती असें दिसत नाही. मिल्टनच्या काळीं अिंग्लंडमधील जनतेचें मत धार्मिक मतमतांतरांत हेलकावत होतें. Puritaniem मुळे दैवतांवरील भावना-भाव दूर होत होता. स्वसंस्कृतिरक्षणाच्या स्फूर्तीने परकीय आक्रमणाचा नायनाट करण्यासाठी वीरवृत्ति स्फुरण पावण्याअेवजी ती आपसांतील यादवींतच खर्ची पडत होती. अशा या यादवीच्या आणि जीवनमूल्यें अस्थिर असणाऱ्या काळांत मिल्टन् जन्माला आला. होमरव्हर्जिलप्रमाणे महाकाव्य लिहिण्याची मनीषा धरणाऱ्या मिल्टन्‌ला तो काळ कांही अनुकूल नव्हता. तरी पण त्याने महाकाव्य लिहिलें. ज्या यादवींत त्याने स्वतः भाग घेतला, त्या यादवींतूनच– राजकीय आणि धार्मिक अराजकांतूनच–त्याने आपल्या महाकाव्याची सिद्धता केली. ही सिद्धता कांही सहजसाध्य नव्हती. ज्या संगरांत त्याला अहमहमिकेने भाग घ्यावा लागला त्यांत त्याची सर्व जीवनशक्ति नष्ट होण्याची शक्यता होती. परंतु ती त्याने टिकविली, आणि अखेर परमेश्वर आणि स्खलनशील मानव यांचा परस्परसंबंध व्यक्त करणाऱ्या महाकाव्याला जन्म दिला. होमरव्हर्जिल्च्या काळची समाजमनःस्थिति आणि मिल्टनच्या काळची समाजमनःस्थिति यांत अितकें महदंतर असूनहि मिल्टन्‌ने महाकाव्य लिहिलें. किंबहुना होमरच्या महाकाव्याच्या विषयापेक्षा मिल्टनच्या महाकाव्याचा विषय जास्त व्यापक आहे. ॲडिसन्‌ने म्हटल्याप्रमाणे 'The whole system of the intellectual world, the chaos and the creation, heaven, earth and hell, enter into the composition of the 'poem.' मिल्टन्‌ने निवडलेल्या धार्मिक विषयाबद्दल गटेसारख्यांनी जरी नापसंती व्यक्त केली असली, किंवा अितर कांही टीकाकारांकडून त्याच्यावर कृत्रिमतेचा आरोप केला गेला असला, तरी Paradise Lost हें निःसंशय महाकाव्याच्या पदवीला पोहोंचलें. मात्र होमरचा महाकाव्याचा विषय आणि त्याच्या आविष्कारार्थ त्याने वापरलेलीं साधनें या बाबतींत मिल्टन्‌ने अदलाबदल केली आहे. अिलियड, ओडेस्सी यांतील अतिमानव वातावरण आणि देव यांनाच मिल्टनच्या 'पॅरेडाअिज् लॉस्ट'मध्ये मुख्य विषयाचा मान मिळाला

आहे. परंतु हा बदल अपरिहार्य होता. ज्या धार्मिक संघर्षातून त्याच्या कवितेने जीवनसत्त्व मिळविलें होतें त्या संघर्षाचाच तो परिपाक होता.

ललितवाङ्मय– मग तें कोणत्याहि प्रकारचें असो– संपूर्णतया स्थलकालनिरपेक्ष असूंच शकत नाही हें खरें. जी निरपेक्षता अंतीं लाभते ती या सापेक्षतेंतूनच आलेली असते. ललित वाङ्मय हें जन्माला येतांनाच मुळीं स्थळकाळाचे गुणधर्म घेऊन जन्माला येतें. त्या त्या स्थळकाळाच्या जीवन-सत्त्वावरच तें पोसलेलें असतें. महाकाव्यहि याला अपवाद असूं शकणार नाही. मात्र स्थळ आणि काळ बदलले की परिस्थिति बदलते. आणि परिस्थिति बदलली की काव्याचे विषयहि बदलतात. परंतु विषय बदलले म्हणून महाकाव्याची परंपरा थांबण्याचें कारण नाही.

- हिंदुस्थानांतहि महाकाव्याची परंपरा कांही काळपर्यंत अखंड राहिली. रामायण, महाभारत या आर्ष महाकाव्यांनंतर, रघुवंश, किरातार्जुनीयादि साहित्यमहाकाव्यें निर्माण झालीं. रामायणमहा-भारतकालीन परिस्थिति आणि रघुवंश, किरातार्जुनीयादिकांच्या काळची परिस्थिति सारखीच होती असें सुतराम् म्हणतां येणार नाही. व्यासवाल्मीकींनी आपापल्या काळचे सत्य, धर्म आणि नीति यांनी युक्त असणारे आदर्श आपापल्या महाकाव्यांत रंगविले. व्यासांनी तर 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वं' अशी स्थिति करून टाकली. परंतु व्यासांच्या त्याच उच्छिष्टावर आपल्या काळच्या रसिकांना पंचपक्वान्नांचें भोजन आकंठ घालून समाधानाचे ढेकर द्यायला लावण्याचें महान् कार्य नंतरच्या साहित्यमहाकवींनी केलेंच. महाभारतांतील अनंत आख्यानांतील स्फुट आख्यानें घेऊन त्यांवरच त्यांनी आपली स्वतंत्र रचना केली. नलदमयंतीची कथा किंवा किरातार्जुनीयाची कथा या कथा म्हणजे लोककथांतून किंवा दंतकथांतून परंपरेने आलेल्या, आणि आपल्या मुख्य कथानकाला उपकारक अशीं उपकथानकें, म्हणून व्यासांनी गुंफिलेल्या. व्यासांनी ज्यांचा उपयोग केवळ साधन म्हणून केला, त्यांच साधनांना साहित्यिक महाकवींनी प्रधान विषयाचा मान दिला आणि त्यावर स्वतंत्र रचना केली.

साहित्य महाकाव्यांचाहि काळ संपला. संस्कृत भाषा फक्त देवभाषा म्हणून राहिली. देशकाल-परिस्थितींत अनेक स्थित्यंतरें झालीं. हिंदुस्थानांत– त्याचप्रमाणे महाराष्ट्रांतहि– अनेक राज्यक्रांत्या झाल्या, अनेक राजवटी आल्या, गेल्या; परंतु महाकाव्य ज्याला म्हणतां येईल असें नामांकित महाकाव्य लिहिलें गेलें नाही. अव्वल मराठी अमदानींत कांही पंडित कवींनी अल्पस्वल्प प्रयत्न केले. पण ते केवळ अनुकरणात्मक होते. केवळ अनुकरण करून महाकाव्य (महाकाव्य काय–कोणतेंहि काव्य) होत नसतें. 'सर्गबद्ध', 'इतिहासकथोद्भूतम्', 'चतुरोदात्तनायकम्', 'रसभावनिरंतरम्', इत्यादि जीं लक्षणें दण्डीने महाकाव्याचीं म्हणून दिलीं आहेत त्यांनी युक्त असें काव्य लिहिलें की तें महाकाव्याच्या पदवीला पोहोंचेल असें शक्य नाही. हा सगळा साज असूनहि त्याच्या आंत महा-काव्याचा प्राण असणार नाही. हा महाप्राण त्यांत घालणारा कवि हा महाकवीच असावा लागतो.

Aristotle, दण्डी किंवा इतर साहित्यशास्त्रज्ञ यांनी महाकाव्याच्या व्याख्या दिल्या आहेत, परंतु त्यांनी महाकवीची व्याख्या दिलेली आढळत नाही. कदाचित् अशा तऱ्हेचें काव्य लिहिणारा तोच महाकवि असा त्यांचा अभिप्राय असेल. आधी कवि आणि मग त्याचें काव्य या दृष्टीने महाकाव्य लिहिणाऱ्या महाकवीला कोणती मोठी साधना केली पाहिजे याचा विचार येथे उद्बोधक होईल. म्हणजे आपोआपच आज अशा मोठ्या साधनेचें महाकाव्य कां लिहिलें जात नाही याचें कारण स्पष्ट होईल.

ज्ञानेश्वर, नामदेव, तुकाराम इत्यादि संतकवि आणि मुक्तेश्वर, श्रीधर, मोरोपंत, वामनपंडित इत्यादि आख्यानकवि या साऱ्यांनाच कवि या नांवाने संबोधिलें जातें. परंतु त्यांच्या त्यांच्या काव्याचें स्वरूप भिन्न भिन्न आहे. हें भिन्न स्वरूप त्या त्या कवींच्या भिन्न प्रकृतीवर अवलंबून असलें पाहिजे. कांही कवींची प्रतिभा तत्त्वज्ञानांत रमेल, कांहींची भावगीतांत रमेल, तर कांहींची कथानकांतील निरनिराळ्या रसांच्या अवगाहनांत रमेल. हे कविप्रतिभेचे भिन्न भिन्न विलास आहेत; आणि या भिन्न विलासांतून निरनिराळे काव्यप्रकार जन्माला आले आहेत, असें थोडक्यांत म्हणतां येईल.

स्वराज्याचा वृक्ष अुन्मळून अव्वल अिंग्रजीला सुरुवात होतांच महाराष्ट्रांतील काव्यप्रतिमेला धक्का बसला. बधिरतेचा कांही काल ओसरतांच जनतेपुढे जुन्या आदर्शांबरोबरच नवे आदर्श अुभे राहिले. स्वराज्यांतील स्वतंत्र शाहिरी काव्यदि मागे पडून पुनः अनुकरणाला सुरुवात झाली. यांत संस्कृतचें अनुकरण प्रथमतः झालें. पण हळूहळू संस्कृतवर अिंग्रजीने मात केली. त्यांतहि या अिंग्रजी काव्यांतहि भावकाव्याने विशेष सरशी केली. १९ व्या शतकाच्या अखेरीअखेरीस आणि २० व्या शतकाच्या सुरुवातीस मराठी कविमनावर जर विशेष कोणत्या काव्यप्रकाराचा परिणाम झाला असेल तर तो भावकाव्याचा. महाभारत, रामायण यांसारख्या अितिहासजमा झालेल्या महाकाव्याकडे पुराणें म्हणून केवळ भाविक आदराने पहावें, रघुवंश, नैषधीयासारखीं साहित्यमहाकाव्यें यांचा काव्य म्हणून आस्वाद घ्यावा, पण Wordsworth, Shelley, Keats अित्यादि पाश्चात्य कवींचें मात्र भारून जाअून अनुकरण करावें असा काळ आला. (अपवाद सांपडणार नाहीत असें नाही, परंतु सर्व-सामान्यपणें हें सांगितलें पाहिजे.) विशेषतः नवशिक्षित पांढरपेशा वर्गावर हा पगडा जास्त बसला; आणि विसाव्या शतकांतील कवींची प्रतिमा जी स्फुरली ती या पाश्चात्यांच्या अनुकरणांतूनच स्फुरली.

पाश्चात्यांच्या वरील प्रकारच्या अनुकरणास आणखीहि एका गोष्टीने चालना मिळाली. व्यक्ति-वादाचे—व्यक्तिविकासाचे—वारे वाहूं लागले. व्यक्तिस्वातंत्र्याच्या कल्पनेने मनें भारलीं गेलीं. समाज, धर्म, संस्कृति अित्यादींचे लागेबांधे व्यक्तिविकासाला मारक वाटूं लागले. या साऱ्यांचा परिणाम व्यक्तिनिष्ठेंत झाला. व्यक्तिनिष्ठेंतून आत्मनिष्ठ मनोवृत्ति अुपजली. आत्मनिष्ठेने अर्वाचीन काव्याचे रंग बदलले असें सामान्यपणें मानलें जातें. अर्वाचीन काळांत वस्तुनिष्ठ काव्याअैवजी आत्म-निष्ठ काव्याला भरती आली, ती या आत्मनिष्ठ वाटणाऱ्या मनोवृत्तीमुळे. प्रस्तुत लेखांत आत्मनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ हे शब्द चालू रूढ संकेताने वापरले आहेत. वस्तुतः व्यापक अर्थाने त्यांत भेद नाही. खरी आत्मनिष्ठा अेका व्यक्तीपुरती राहणारच नाही. आत्मौपम्याने ती सर्वत्र सम पाहाते. 'म्हणोनि आपणपां विश्व देखिजे । आणि' आपण विश्व होइजे' हा तिचा बाणा आहे. परंतु आत्मनिष्ठा आणि वस्तुनिष्ठा यांचा विस्ताराने विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. तूर्त अितकेंच म्हणतां येअील की व्यक्ति-वादांतून निघालेली ही आत्मनिष्ठा आत्म्यापर्यंत पोहोचलीच नाही. तशी ती पोहोंचती तर सारें विश्व तिच्यांत सामावलें असतें. त्याअैवजी मुलें जशीं सरोवराच्या काठावर पाण्यांत पाय सोडून बसतात आणि पाण्यावरच्या तरंगाशींच खेळतात, तशी ती कविहृदयांत अुमटणाऱ्या भावलहरींशींच खेळूं लागली. तेवढ्यांतच ती रमूं लागली, आणि वैयक्तिक भावनाविष्कार हेंच तिचें प्रधान कार्य ठरलें. 'Spontaneous outburst of powerful feelings', 'Expression of impressions', 'The best and the happiest moments in the best and the happiest minds', अशा तऱ्हेच्या व्याख्या रूढ झाल्या. कवींच्या मनांत जे जे भावतरंग अुठले असतील, ते ते तरंग अुत्कृष्ट मोजक्या शब्दांत अत्यंत अुत्कटतेने आणि परिणामकारकतेने व्यक्त करण्याचें कार्य केलें म्हणजे भावकाव्याचें कार्य संपलें. भावकवि हा संपूर्णतया आत्मनिष्ठ असतो. बाह्य जगाकडे त्याने डोळे अुघडून पाहिलें, तरी तो आत्मनिष्ठेंतूनच पाहतो. बाह्य दृश्याचें वर्णन करतांना त्या दृश्याने त्याच्या मनावर काय परिणाम झाला हेंच तो [1]सांगेल. परंतु कथाकवि, आख्यानकवि किंवा महाकवि यांची दृष्टि निवळ आत्मकेंद्रित राहत नाही. भावकवि आणि हे कथाकवि, आख्यानकवि किंवा महाकवि यांच्या मूलभूत प्रकृतींतच फरक आहे. प्रतिभेची देणगी या साऱ्यांनाच असते, आणि साऱ्यांचीच प्रतिभा तसें म्हटलें तर क्षणजीवी असते. परंतु या क्षणजीवी प्रतिभेने जें अेक क्षणमात्र दर्शन दिलें असेल, त्या अेका क्षणांत अनंतकालचीं दृश्यें पाहणें न पाहणें हें त्या त्या कवीवर अवलंबून आहे. भगवंतांनी दिव्यचक्षु देतांच अर्जुनाला जसें विश्वरूपदर्शन झालें, तसें प्रतिभेच्या साक्षात्कारक्षणीं कवीलाहि

१. काव्याचें खरें क्षेत्र भावगीतांचेंच आहे असें अेक मत रूढ होअूं पाहत आहे. (प्रदक्षिणा पा. ३) परंतु या मताचा विचार करण्याचें हें स्थळ नव्हे. त्याचा विचार विस्ताराने आणि स्वतंत्रपणेंच करणें बरें.

विश्वाचें दर्शन झालें पाहिजे. भावकवींना देखील या साक्षात्कारक्षणीं बिंदूंत सिंधु दिसतो. परंतु भावकवींची दृष्टि आत्मकेंद्रित असल्यामुळे ती त्या दृश्यावर स्थिर होत नाही. तर त्यामुळे त्यांच्या भावना ज्या हेलावल्या असतील त्यांचेंच वर्णन ते करतील. या अुलट कथाकवि किंवा महाकवि यांची दृष्टि त्या बाह्यदृश्यावर स्थिर राहते. कथाकवींत किंवा महाकवींत आत्मनिष्ठा मुळीच नसते असें नव्हे. आत्मनिष्ठा असते, पण ती वस्तुनिष्ठेला जन्म देण्यापुरतीच. क्रौंचमिथुनाच्या वधदर्शनाने वाल्मीकींच्या हृदयांतून आर्तोद्गार निघाला, पण त्या आर्तोद्गारांतून रामायण जन्माला आलें.

भावकवीहून महाकवि जसा या वस्तुनिष्ठेच्या बाबतींत निराळा असतो, तसाच तो कथाकवि किंवा आख्यानकवि यांहूनहि निराळा असतो. कथाकवीहि वस्तुनिष्ठ आणि महाकवीहि वस्तुनिष्ठ, पण कथाकवि अेक अेक कथानक घेअून त्या अेकेकावरच काव्य लिहील. त्याचें काव्य फार तर खंडकाव्य होअील. खंडकाव्यांत अेकच कथानक घेअून तें रंगवून, परिणामकारकतेने, रसभावपूर्णतेने त्याने सांगितलें असेल. जगांत कितीतरी प्रसंग हरघडीं घडत असतात की त्या प्रत्येकावर अेकेक स्वतंत्र खंडकाव्य लिहितां येअील. परंतु महाकवीची दृष्टि अेका कथानकावर स्थिर होत नाही. त्या खंडकाव्यावर ती संतुष्ट राहत नाही. अशीं कितीतरी खंडकाव्यें त्याच्या अेका दृष्टिक्षेपांत येतात. त्यांचा पूर्वापर संबंध त्याच्या लक्षांत येतो. तीं निरनिराळीं नसून अेकाच महान् विषयाशीं निगडित असल्याची जाणीव त्याला होते, अितकी त्याची वस्तुनिष्ठ दृष्टि व्यापक आणि विशाल असते. ही साधना सहजासहजीं होअूं शकेल असें म्हणतां येणार नाही. कवि हा जन्मावा लागतो अेवढें म्हणून भागणार नाही. जन्मावा तर लागतोच, पण त्या कविजन्माचें सार्थक करण्याला त्याला तितकीच तपश्चर्याहि करावी लागते. 'I should not devote less than twenty years to an epic poem' ten years to collect material and warm my mind with universal science, the next five in the composition of the poem, and the five last in the correction of it." अशी Coleridge ने कबुली दिली ती अुगीच नव्हे. Milton ने तर Paradise Lost लिहिण्यापूर्वी त्याच्याहिपेक्षा जास्त वर्षे घेतलीं. संस्कृतसाहित्यमहाकवींनी देखील रामायणमहाभारतांच्या परिशीलनांत कितीतरी वर्षे घातलेलीं असतील. या तपश्चर्येतून येणारी दृष्टि व्यापक आणि विशाल होते. वर्तमानाबरोबर भूतकालाचेंहि ती आकलन करते. भविष्याचींहि स्वप्नें तिला दिसतात. आपल्या वस्तुनिष्ठ व्यापक दृष्टींत सर्व जीवनपट कवीला स्पष्ट दिसतो. त्यांत त्याला अनेक खंडकाव्यांच्या कथा दिसतील, अनंत भावगीतांचे विषय होअूं शकणारे आर्तोद्गार अैकूं येतील, अनेक समरप्रसंग स्पष्ट होतील, अनेक स्वभावांचे नमुने आढळतील, मानवी मनावर परंपरेने चढलेले संस्कारांचे पापुद्रे अुलगडतील, अेका विशिष्ट स्थितीला मानवी समाज कां व कसा आला याचें निदान होअील. सारांश, व्यापक जीवनाचें संपूर्ण मर्म त्याला दिसेल. जीवनाचें हें मर्म डोळसपणें पाहून जो जीवनपट त्याच्या दृष्टीपुढे अुलगडला जाअील, त्याचें सामग्र्याने वर्णन करून सांगणें हें काम सहजसाध्य नाही, त्याला महाकवीच पाहिजे.

सारांश, व्यापक वस्तुनिष्ठ दृष्टीचा अभाव हेंच अर्वाचीन काळांत– विशेषतः मराठींत– महाकाव्यें कां लिहिलीं जात नाहींत याचें प्रमुख कारण म्हणून सांगतां येअील. कुंटे यांचा 'राजा शिवाजी,' साधुदासांचा 'विहार,' टिळकांचें 'ख्रिस्तायन' यांसारखे कांहीं प्रयत्न झाले. परंतु ते महाकाव्याच्या पदवीला पोहोंचूं शकले नाहीत. सावरकरांनी महाकाव्यानुकूल असा विषय घेतला, परंतु तो विषय तसाच राहिला. त्यांची महाकाव्याची प्रतिभा अितरत्र वळली. वस्तुनिष्ठ अशीं कांही खंडकाव्यें लिहिलीं गेलीं, परंतु तीं खंडकाव्येंच राहिलीं. महाकाव्याची झेप घेण्याची ताकद त्यांच्यांत नव्हती.

काव्यप्रांत सोडून अितर गद्यवाङ्मयप्रांताकडे वळलें तर कथा-कादंबरी-नाटक यांतहि वस्तुनिष्ठेची आवश्यकता असते. नाटकांत वस्तुनिष्ठेबरोबर आत्मनिष्ठाहि असली, तरी तें संपूर्णतः आत्मनिष्ठ नसतें. अर्वाचीन काळांत वस्तुनिष्ठ काव्यप्रतिभेने विषयविभागाचें तत्त्व स्वीकारून आपल्या विलासासाठी काव्याचें प्रांगण सोडून गद्याचें प्रांगण पत्करलें की काय असा विचार मनांत डोकावणें

अशक्य नाही. कारण कांही कांही कादंबऱ्यांतून आणि नाटकांतून महाकाव्याचे कांही गुण आढळतात, आणि त्यामुळे त्या वाङ्मयकृतींना महाकाव्याच्या स्थानीं बसविण्याकडे कांहींची प्रवृत्ति होते. किंबहुना यापुढील काळांत महाकाव्याची जागा या महाकाव्यात्मक कादंबरीनाटकांकडून घेतली जाईल असाहि तर्क केला जातो. परंतु हा तर्क तपासून पाहण्यासाठी महाकाव्य आणि कादंबरी— अर्थात् महाकादंबरी,— महाकाव्य आणि महानाटक असे विषय घेऊन विचार करणें आवश्यक आहे. परंतु प्रस्तुत स्थळीं तें शक्य नाही.

अर्वाचीन काळांतील महाकाव्याच्या अभावाचें कारण विकारवशतेच्या अभावांत, किंवा विवेकवादामुळे वा संशयवादामुळे उत्पन्न झालेल्या अश्रद्धेच्या अस्तित्वांत किंवा प्रतिभेच्या क्षणभंगुरत्वांत आहे असें म्हणतां येणार नाही. किंबहुना सद्यःपरिस्थितींतील भावकाव्यानुकूलतेंत आहे असेंहि म्हणतां येणार नाही. तर उलट महाकाव्याला आवश्यक अशा महान्, व्यापक, वस्तुनिष्ठ दृष्टीच्या अभावांत आहे. हा अभाव वर उल्लेखिलेल्या परिस्थितीने निर्माण झाला असेंहि म्हणतां येणार नाही. कारण ही दृष्टि असेल तर अश्रद्धेच्या काळांतहि त्या अश्रद्धेमुळे उत्पन्न होणाऱ्या मानसिक आणि सामाजिक संघर्षावर महाकाव्य लिहितां येईल. त्यांतहि भव्योदात्तता आढळेल. अतिमानुष व्यक्तीपेक्षा सामान्य मानवतेंतहि विशालता दिसेल. बदललेल्या आणि बदलणाऱ्या जीवनमूल्यांनी निर्माण झालेल्या संघर्षांतहि भीषणता आढळेल. आणि त्या भीषण संघर्षावरहि मात करणाऱ्या वीरमहापुरुषांत धीरोदात्तता, करुणरम्यता इत्यादि आढळतील. मात्र सर्व परिस्थितींत मुरून उरणारी व्यापक महान् वस्तुनिष्ठ दृष्टि पाहिजे. तिची ज्याने साधना केली असेल तोच महाकाव्य लिहूं शकेल; आणि ती जोंवर नाही, तोंवर महाकाव्य निर्माण होणार नाही.

---

# पहिल्या पंचवीस महाराष्ट्र साहित्य संमेलनांच्या अध्यक्षांचीं भाषणें आणि त्यांतून उद्भवणारे साहित्यिक प्रश्न

ले० दु. का. संत

(प्रस्तुत निबंध नाशिक येथील संमेलनाने पारितोषिकार्ह ठरविलेला निबंध आहे. त्याआधीचें सोलापूर येथील संमेलन सव्विसावें असूनहि पंचविसावें धरलें गेलें, व तोंपर्यंत झालेल्या संमेलनाध्यक्षांच्या भाषणांविषयींचे विवेचनपर निबंध नाशिक संमेलनाच्या चालकांनी मागविले. पारितोषिकार्ह ठरलेला हा निबंध सामान्य वाचकांस आजपर्यंत उपलब्ध झालेला नाही. जुनीं सा. संमेलनाध्यक्षांचीं भाषणें आज सर्वांनाच उपलब्ध नाहीत. त्यांचा आशय व त्या भाषणांमधून उपस्थित झालेल्या प्रश्नांची चर्चा मराठीच्या अभ्यासकांस उद्बोधक होतील असें वाटल्याने प्रस्तुत निबंध पत्रिकेंत दोन खंडांमध्ये आम्ही देत आहों. यांतील कांही माहिती प्रा. पोतदार यांच्या म. सा. परिषद् इतिहासांत आलेली असली, तरी तो इतिहासहि सर्वांच्या वाचनांत आला नसल्याने पुनरुक्तिदोषहि विशेष होणार नाही अशी आशा आहे. —सं०)

## पूर्वार्ध

वर्तमानकालाच्या क्षितिजावरील भविष्यकालाच्या धूसर धुक्यांतून महाराष्ट्र विद्यापीठाच्या भव्योदात्त शिखराचें दर्शन आज आपणांस उत्सुकतेने का होईना पण होऊं लागलेलें आहे. आणि अर्थात् 'मराठी भाषा मुमूर्षु झाली आहे', 'मराठीची पीछेहाट होत आहे' इ० प्रकारचे अभद्र



अनुक्रमणिका

आक्षेप आज कोणास घेतां येणें शक्य नाही. असें असलें तरी सगळें राष्ट्र आज अशा विचित्र परिस्थितींत सांपडलें आहे, परिस्थितीचे कालाक्रमाणे थंड मारणारे पाश अितक्या वेगाने आवळले जात आहेत की, त्यांचा प्रतिकार कसा करावयाचा, असा प्रश्न राष्ट्रांतील विचारी व्यक्तींपुढे पडला आहे. या परिस्थितीचा देशाच्या साहित्यावर परिणाम होणें अपरिहार्य आहे.. साहित्याने प्राप्त परिस्थितींत करावयाच्या कार्याची कितीहि जाणीव असली तरी, परिस्थितीच्या या कचाट्यांत साहित्याचें हें अुद्दिष्ट कार्य त्याकडून पार पडेलच असें सांगतां येत नाही. आज आपणांस अितिहासाचें चांदणें आल्हाद देत नाही, वर्तमानाचा गारठा सहन करवत नाही. सर्वांचे डोळे भविष्याच्या अुदरांत कोणकोणत्या गोष्टी दडून बसल्या आहेत हें पाहण्याकडे लागले आहेत. अशाहि वेळीं अितिहासाचें अवलोकन केलें तर तें झालें तर अुद्बोधकच होअील अशा आशेने ह्या विषयावर मी आपले विचार प्रकट करण्याचें धाडस करीत आहे.

विषयाचे विवेचनाचे सोयीसाठी, विषयाच्या स्वरूपाचे अनुषंगाने दोन विभाग केले आहेत. अुद्भवणाऱ्या प्रश्नांचा अूहापोह दुसऱ्या विभागांत करणें सोयीचें वाटलें. अर्थात् भाषणाचें समालोचनात्मक विवेचन वा त्यांतील आशय प्रथम भागांत करणें युक्त आहे.

विषयव्याप्तीच्या मर्यादा:— 'महाराष्ट्र साहित्य संमेलन' या साहित्यिकांच्या महासभेचीं आजवर पंचवीसच अधिवेशनें झालीं असलीं, तरी त्यांनी व्यापिलेला काल मात्र पंचवीस वर्षांपेक्षा कितीतरी अधिक आहे; 'म. सा. संमेलन' म्हणून भरलें गेलेलें पहिलें संमेलन १८८५ त असल्याचा निर्देश आढळतो, आणि पंचविसावें १९४१ मध्ये सोलापुरास भरलें. या अेकूण पंचवीस अधिवेशनांतून आणि पंचावन्न वर्षांच्या कालावधींत निरनिराळ्या अध्यक्षांनी साहजिक 'साहित्य संमेलना'चें कार्य, ध्येय अि० गोष्टींचा बराच अूहापोह केलेला, आणि तो पाहतां साहित्यविषयाकडे बघण्याचा दृष्टिकोणसुद्धा बराच व्यापक व विशाल होत आलेला दिसावा हेंहि स्वाभाविकच आहे. पहिल्यापहिल्याने जीं अधिवेशनें भरलीं तीं प्रामुख्याने ग्रंथकारांचीं म्हणून होतीं, व त्यांतूनच येतां येतां त्यांस पुढे प्रस्तुतचें 'साहित्यसंमेलना'चें स्वरूप प्राप्त झालेलें आहे. अर्थात् वर अुल्लेखिलेला फरक त्यांत होत जाणें हें सर्वथा क्रमप्राप्त होतें. हा फरक प्रत्यक्ष कोणकोणता होत गेला व तो कसकसा होत आला आहे हें स्पष्टपणें कळून यावयाचें तर त्या पंचवीस अधिवेशनांच्या अध्यक्षांनी जीं भाषणें केलीं तीं पाहणें व त्यांतून वेळोवेळीं अुपस्थित झालेले साहित्यविषयक प्रश्न आढावारूपाने दृष्टीपुढून जाअूं देणें यांच्या योगानेच तें अुत्तम साध्य होअील.

प्रथमारंभींच हें सांगून टाकणें आवश्यक आहे की येथे 'साहित्यविषयक' हा शब्द त्याच्या व्यापक अर्थानेच घ्यावयास पाहिजे. साहित्यशास्त्रांत 'साहित्य' या शब्दास जो अर्थ आलेला आहे तेवढाच संकुचित अर्थ भाषेच्या मौलिक विचाराचे वेळीं धरून भागत नाही; व म्हणून येथेहि तो तसा घेतां येणार नाही. भाषाशास्त्राच्या नियमांप्रमाणे कोणत्याहि जिवन्त नि कर्तृत्ववान् अशा समाजाची, प्रत्यक्ष नित्याच्या व्यवहाराची नि वाङ्मयाची बोधभाषा म्हणून जिला स्थान प्राप्त झालेलें असतें तिच्या कार्यव्याप्तीचें स्वरूप आपोआपच अतिशय विशाल होतें. मराठी ही तशीच अेका जिवंत नि कर्तृत्ववान् समाजाच्या नित्य व्यवहाराची बोधभाषा आहे. अर्थात् मराठी भाषेच्या अस्तित्वाच्या, संवर्धनाच्या वा अलंकरणाच्या दृष्टीने जे जे अनेक प्रश्न अुद्भवणारे आहेत त्या सर्वांचाच समावेश 'साहित्यविषयक' या सदरांत करावयास हवा. ललितवाङ्मयाच्या व लालित्याच्या शास्त्राचें वाङ्मय, वा विचारवाङ्मय, हे सर्व भेद साहजिकपणेंच त्यामध्ये येतात.

तशीच दुसरीहि गोष्ट सांगितली पाहिजे, व ती म्हणजे साहित्यविषयक प्रश्न म्हणून जे येथे विवेचावयाचे आहेत, ते केवळ अध्यक्षीय भाषणांतून अुपस्थित होत असलेले तेवढेच विवेचावयाचे आहेत. वस्तुतः आजपर्यंतच्या संमेलनांतूनच अुद्भवलेले प्रश्न जर विचारांत घेतले गेले असते, तर

तें अधिक अुद्बोधक नि सयुक्तिक झालें असतें. कारण नुसतीं अध्यक्षीय भाषणें हीं कांही तत्कालीन वाङ्मयविषयक चळवळींचीं अेकमेव गमक वा निदर्शक होअूं शकत नाहीत. अध्यक्षीय भाषण हा बोलून चालून अेक वैयक्तिक स्वरूपाचा व्यवहार असल्याने त्या त्या अध्यक्षाचें साहित्यांतील व समाजांतील व्यक्तिगत जें स्थान असेल त्यावरच पुष्कळ गोष्टी अवलंबून असतात. साधारणतः बाहेरच्या वातावरणांत त्या त्या काळीं ज्या साहित्यविषयक अपेक्षा अुत्पन्न होअून वावरत असतात किंवा जे साहित्यविषयक प्रश्न घुमत असतात त्यांचे पडसाद तरी अध्यक्षीय भाषणांतून अुमटावयास हवेत व तसे ते अुमटतातहि. परंतु त्यांपैकी कोणत्याहि प्रश्नाचा वा प्रश्नांचा संपूर्ण पुरस्कार किंवा संपूर्ण निरास या गोष्टी, त्या त्या प्रश्नांसंबंधींचा विशिष्ट जिव्हाळा नि तसा अधिकार अध्यक्षांचे ठायीं असल्याविना घडूं शकत नाही. अुदाहरणार्थ, मराठी भाषेच्या शुद्धीचा प्रश्न घेतला तर श्रीपाद कृष्णांसारखा संमेलनाध्यक्ष असतांना त्यांच्या भाषणांत बाहेरील वातावरणांतील त्या चळवळीचा पडसाद मात्र अुमटलेला दिसेल, परंतु तिचा निःसंदिग्ध पुरस्कार मात्र डॉ. माधवराव पटवर्धन किंवा बॅ. सावरकर हे संमेलनाध्यक्षपदीं आल्यावर व्हावयाचा हें स्पष्ट आहे. तीच गोष्ट महाराष्ट्र विद्यापीठाची. तो प्रश्न अितर कोणत्याहि अध्यक्षांपेक्षा प्रो. पोतदार हेच कालांतर झालें तरीहि खऱ्या पोटतिडिकेने पुरस्कारणार.

**संमेलनांच्या अितिहासाचें विहंगमावलोकनः**— पहिलें साहित्यसंमेलन केव्हा भरलें तें आज निश्चितपणें अवगत नाही. न्या. मू. रानड्यांना ही कल्पना सुचून त्यांनी त्या संबंधांत पुष्कळ प्रयत्न केले. परंतु १८८५ पर्यंत त्यांच्या प्रयत्नांस मूर्त स्वरूप आलेलें दिसत नाही.[1] अि.स.१८८५ या वर्षी मात्र पुण्यास त्या हेतूने कांही मंडळी वेद० कृष्णशास्त्री राजवाडे यांच्या अध्यक्षतेखाली अेकत्र जमली. आगरकरसुद्धा त्या मेळाव्यांत अुपस्थित होते. त्या वर्षी बीभत्स वाङ्मय, तसेंच फारशी शब्दांचा बहिष्कार अि० विषयी चर्चा झाली. त्या मेळाव्याची अेकूण संख्या सुमारें ३०० होती. परंतु त्यानंतर त्या गोष्टीला जो अेकदम खंड पडला तो पुढे २० वर्षेपर्यंत त्याविषयी कांहीच हालचाल झालेली नाही. १९०५ मध्ये दुसरें संमेलन साताऱ्यांस दादासाहेब करंदीकर यांचे अध्यक्षतेखाली भरलें. त्या वेळीं सुद्धा केवळ मौज म्हणून कांही ग्रंथकार अेकत्र जमले होते. १९०६ सालीं पुण्यास गोविंद वा. कानिटकर यांचे अध्यक्षतेखाली पुण्यास तिसरें संमेलन भरलें. त्या वेळेस मात्र ठरावांस व त्यांच्यावरील चर्चेस सुरुवात झाली. विद्यापीठांत मराठीचा प्रवेश अि० विषय चर्चेचे होते. १९०६ ते १९०९ पर्यंत निरनिराळ्या ठिकाणीं संमेलनें भरलीं. परंतु पुढे ३ वर्षेपर्यंत अेकहि भरलें नाही. १९१२, १९१५, १९१७, १९२१ अशीं भरत आलीं. १९२१ पासून १९२६ पर्यंत पुन्हा अेकहि संमेलन भरलें नाही. १९२६ ते १९३६ या अवधींत मात्र नियमितपणें भरलीं. १९३७ हें वर्ष मात्र तसेंच गेलें व पुढे आतापर्यंत तरी क्रमाने तीं भरत आलीं आहेत. तेव्हा १८८५ पासून अेकंदर पंचवीस अधिवेशनें भरलीं तरी पहिल्यापासून प्रस्तुत वर्षीच्या २६ व्या संमेलनापर्यंत प्रारंभीं अुल्लेखिल्याप्रमाणे ५५ वर्षांचा काल त्यांनी व्यापिला आहे.

**विचारांचा विकासः**— गेल्या शतकाच्या शेवटच्या चतुर्थकांत ह्या देशांत जें पुनरुज्जीवन चालू झालें त्याचें प्रतिबिंब देशाच्या संसाराच्या अितर अंगांप्रमाणे ह्या साहित्यप्रांतांतहि दिसून आल्यावाचून राहत नाही. अिंग्रजांची राजवट येथे सुरू झाल्यावर सुशिक्षित लोकांत विचारांच्या दोन कृत्रिम परंपरा निर्माण झाल्या. अेकीचें वैशिष्ट्य म्हणजे सामाजिक बाबतींत पुरोगामी (सुधारणावादी) राहावयाचें व राजकीय बाबतींत सरकारशीं मिळतें घ्यावयाचें हें, व दुसरीचें याच्या अुलट, म्हणजे राजकीय संबंधांत पुरोगामित्व असावयाचें व सामाजिक विषयांना गौणत्व द्यावयाचें. चळवळीच्या वातावरणांत या परंपरा 'मवाळ' व 'जहाल' या नांवांनी ओळखिल्या जातात. या दोन्ही प्रवृत्तींचें प्रतिबिंब येथेहि आपणांस पाहण्यास मिळतें. परंतु राजकारणांतली 'राष्ट्रीय सभा' ही ज्याप्रमाणे मवाळांच्या

१. पहिलें ग्रंथकारसंमेलन ११ मे १८७८ ला पुणें येथे भरलें होतें असें प्रा. न. र. फाटक यांच्या रानडेचरित्र पृ. २९९ वरून म्हणतां येअील. —सं०

हातून जहालांच्या हातांत जात जात आज ती पूर्णपणें लोकनियुक्त नि क्रांतिकारक संस्था बनली आहे, तसाच प्रकार मात्र त्या मानानें येथे मुळीच झालेला दिसत नाही. राष्ट्रीय विचारांच्या वर्धनास पूरक व पोषक असें कार्य ह्या साहित्यप्रांतांतील लोकांकडून झालें आहे. परंतु प्रवर्तक विचारांचा झेंडा धरण्याचें कार्य मात्र या सभेकडून झालें नाही हें कटु सत्य आहे. अर्ज-विनंत्यांच्या राजकारणांतून 'राष्ट्र-सभा' कितीतरी पूर्वी बाहेर पडली. परंतु त्याच गोष्टींचा नुसता अन्धुक पडसाद अुमटावयासहि या क्षेत्रांत १९२८ साल अुजाडावें लागलें (परांजपे भाषण). अर्थात् अितक्या मंदगतीनें विचार-क्रांतिकडे वळणारें हें साहित्यसंमेलन आजहि पूर्णपणें त्या चाकोरींतून बाहेर पडलें नसलें तर त्यांत आश्चर्य नाही.

**तीन कालखंडः**—या दृष्टीने या कालखंडाचे साधारण स्थूल मानानें तीन भाग पडतात. पहिला विभाग (गेलें) युद्धपूर्व कालाचा. ह्या कालास 'विशुद्ध राजनिष्ठेचा काल' असें म्हणतां येअील. कारण बहुतेक (नव्हे जवळ जवळ प्रत्येक) अध्यक्षांनी राजाविषयी वा सरकारविषयीचा आपला आदर वा विश्वास स्पष्टपणें बोलून दाखविला आहे. दुसरा भाग साधारणपणें १९२१ ते १९३५ इतका मोठा पडतो. ह्या कालास 'वाङ्मयीन विलासवृत्तीचा काल' असें नांव देतां येअील. ह्या कालांत अेखादा डॉ. केतकरांसारखा अपवाद सोडून दिल्यास साधारणपणें प्रत्येक अध्यक्षानें जणूं वाङ्मयाचा प्रांत हा समाज वा राजकारण यापासून अलिप्त आहे असें समजून साहित्याचें शास्त्रीय (मूल्यमापनात्मक) विवेचन केलें आहे. अलंकरणाच्या दृष्टीनें ह्यासुद्धा अवस्थेस अेक विशिष्ट महत्त्व आहे. परंतु संवर्धनाची वा अस्तित्वाची व्यापक कल्पना घेतल्यास त्या समजुतीला थारा देअून चाल-णार नाही. अेकट्या डॉ. केतकरांना काय ती जाणीव झालेली दिसते, व म्हणूनच त्यांचा अपवाद वर काढिला आहे. तथापि सर्वांगीण विकासाचे दृष्टीने ही अवस्थाहि कांही अधिक वेळ राहिली तरी ती विशेष मारक झाली आहे असें मात्र नव्हे. तिसरा कालखंड १९३६ चे पुढे. या कालखंडास साधा-रण मानानें 'कृतिदौर्बल्याच्या जाणिवेचा काल' हें नांव शोभेल. या काळांतील प्रत्येक अध्यक्षाला या दौर्बल्याची जितक्या तीव्रतेनें जाणीव झालेली दिसते, तितक्या तीव्रतेनें ती तत्पूर्वी कधीच झालेली दिसत नाही. भाषाशुद्धिविरोधकांच्या आक्षेपांचा समाचार घेण्यापूर्वी डॉ. पटवर्धनांनी या गोष्टीचा स्पष्ट अुल्लेख केला आहे. संकुचित दृष्टि व फटकून वागण्याची प्रवृत्ति त्यांना अगदी सलते आहे असें वाटतें. तीच गोष्ट सावरकरांची. भाषाशुद्धीचीं आचरणात्मक सूत्रें सांगितल्यावर शेवटीं त्यांनी 'लेखण्या मोडा व बन्दुका घ्या' असा संदेश दिला आहे, तो कोणत्या जाणिवेच्या पोटीं ? प्रो. पोतदारांनी सुद्धा 'मराठीचा झेंडा मिरवा' असा अुपदेश केला व प्रा. फडके-खांडेकरांनी जरी दोन वाङ्मयप्रकार विचारांत घेतले असले तरी त्या दोघांच्याहि भाषणांतून वरील जाणिवेचें प्रतिबिंब स्पष्ट पडलेलें दिसून येतें. त्यांच्यावर कितीहि टीका झालेली असली तरी अेका भयानक वस्तुस्थितीचा आधार त्यांस निश्चितपणें होता असें म्हणणें गैर होणार नाही. खांडेकरांच्या भाषणांत तर ही जाणीव अत्यंत तीव्र-तेनें दिसते. साहित्याचें आजच्या विशिष्ट परिस्थितींतलें कार्य त्याच्याकडून होत नाही, ही वस्तुस्थिति त्यांना अत्यंत अस्वस्थ करून सोडते. अेकूण तीनहि कालखंडांचा साकल्यानें विचार करतां साहित्य-विषयक विचारांचा गुरुत्वमध्य हा क्रमाक्रमानें समष्टिहिताच्या क्षेत्राकडे झुकत चाललेला आहे, व अलीकडे तर त्याचा वेग झपाट्यानें वाढत आहे असें प्रत्ययास येतें.

**भाषासामर्थ्याचा प्रत्ययः**—केवळ भाषासामर्थ्याच्या वा वाङ्मयीन गुणांच्या दृष्टीने पाहिलें, तरीसुद्धा मराठी भाषा सामर्थ्यसंपन्न, प्रभावी, सुंदर, व विचारांचें, भावनांचें वा व्यावहारिक गोष्टींचें व्यक्तीकरण करण्यास समर्थ अशी होत आहे याची जाणीव पदोपदीं होते. शैलीला बरेंचसें व्यक्तिनिष्ठ स्वरूप असलें तरी एकंदर दृष्टीनें मराठीची सर्गशक्ति, सौष्ठव नि अिष्टार्थव्यंजकता झपा-ट्यानें वाढत आहे हें अगदी अलीकडचीं भाषणें ओझरतीं वाचलीं असतांहि दिसून येतें. अुपरि-निर्दिष्ट मधल्या कालखंडानें तिच्या अंगीं भाषाशास्त्रीय निवेदनक्षमता आणली, व शेवटच्या कालखंडांत

ती सुगमता, सौंदर्य व शुद्धता या गुणांकडे ओढली जात आहे असें स्पष्ट दिसतें. प्रा. फडक्यांची बोललें जातें तसें लिहिण्याची ढब, खांडेकरांची काव्यमय नि सुंदर लिहिण्याची पद्धति, नि प्रा. पोतदारांची वा भाषाशुद्धिवाल्यांची जुने वा नवे मराठी शब्द ठसकेबाज तऱ्हेने उपयोगांत आणण्याची प्रवृत्ति यांवरून कोणती गोष्ट दृष्टोत्पत्तीस येते? मराठीस येत असलेलें हें विशाल नि प्रगल्भ स्वरूप पाहिलें की क्षणभर आनंदाने हृदय भरून येतें.

**भाषणांतील व्यक्तिगत भिन्नता:**—गेल्या साठ वर्षांच्या कालखंडांत पुष्कळच मोठमोठ्या धार्मिक, सामाजिक, राजकीय नि आर्थिक इ० घडामोडी होऊन गेल्या. त्यांचा निर्देश येथे करण्याचें सामान्यतः कांही कारण नसलें तरी त्या सर्वांची पृष्ठभूमि या साहित्यप्रांतीय घडामोडींची आहे हें लक्षांत घेणें अवश्य आहे. तसेंच साहित्यविषयक चळवळींचाच तेवढा विचार करावयाचा म्हटला तरी सुद्धा त्यांचें प्रतिबिंब सर्व अध्यक्षीय भाषणांतून पडेलच असें नसल्याने तो विचारहि साकल्याने करतां येईल असें नाही. कारण अमुक अेक विषय निवडणें हें सर्वस्वीं अध्यक्षाच्या व्यक्तिविशिष्ट, सामाजिक वा वाङ्मयीन स्थानावर वा मानावर अवलंबून आहे. याच कारणाने या भाषणांतून साहित्यविषयक प्रगतीचा क्रम सुसूत्र न राहतां त्यांतून विस्कळितपणा, पुनरुक्ति व पाल्हाळ हे दोष बरेच आढळतात.

प्रथम भाषणांतून आलेल्या समालोचनांवर थोडें लिहिणें आवश्यक आहे. बऱ्याच अध्यक्षांनी आपल्या भाषणांतून समालोचनपर अुल्लेख आणिले आहेत. कांहींनी त्यावरच बराच भर दिलेला आहे, तर कांहींनी ओझरता अुपयोग करून घेतला आहे. या समालोचनाचे दोन प्रकार पडूं शकतात. अेक मराठींतील सारस्वताचें आरंभापासून समालोचन करणें हा व दुसरा म्हणजे त्यां वर्षांत अगर तत्पूर्वीच्या कालांत प्रसिद्ध झालेल्या मुख्य मुख्य ग्रंथांचें महत्त्वनिदर्शन करणें हा. अशीं समालोचनें प्रथमारंभीं किंवा मधून केव्हा केव्हा येणें अिष्ट असलें तरी, तशा प्रकारें समालोचन करणें हा जणू एक प्रकारचा अलिखित संकेतच आहे, अशीच भावना १९३० च्या संमेलनापर्यंत बहुधा प्रत्येक अध्यक्षाची ठाम होऊन गेलेली दिसते. वास्तविक अिष्ट असतें तेव्हासुद्धा वाङ्मयाचें समालोचन करणें हें वाटतें तितकें सोपें नसतें. त्याकरिता अवश्य असणारी अैतिहासिक पद्धतीची बैठक प्रा. पोतदारांसारख्या कांही थोड्यांच्याच ठिकाणीं आढळते. त्या अैतिहासिक पद्धतीचें महत्त्व लक्षांत न आल्याने शिवरामपंत परांजपे किंवा वा. म. जोशी यांसारख्यांकडूनहि निव्वळ पुस्तकांचीं नांवें वाक्यांत चमत्कृतिजनक रीतीने गुंफण्याचीच कसरत झाली आहे! परंतु अकारण कंठाळी होऊन गेलेल्या त्या अप्रयोजक प्रथेला १९३१ मधील सोळाव्या संमेलनाच्या प्रसंगीं डॉ. केतकरांनी ती साक्षात् मोडूनच प्रथम धक्का दिला. अशा प्रकारचा आढावा घेतला जाणें हें आवश्यक असलें तरी विशेषशा बुद्धिमत्तेची गरज नसणारें निव्वळ कष्टाचें हें काम अध्यक्षाने न करतां अेखाद्या तज्ज्ञ समितीकडून झालें तरी चालण्यासारखें आहे अशी त्यांनी सूचना केली, व ती सर्वस्वीं सयुक्तिक असल्याने त्यांच्यानंतरच्या तीन चार अध्यक्षांव्यतिरिक्त पुढे सर्वांनीच ती अंगीकारिली.

**भाषणांचा स्थूल मानाने आशय– (गेलें) युद्धपूर्वकाल :**— या संमेलनास प्रथम 'ग्रंथकारांचें संमेलन' असें स्वरूप होतें हें आरंभीं आरंभीं सांगितलेंच आहे. त्यांतहि पहिलीं तीन अधिवेशनें तर केवळ औपचारिकच होतीं. त्यांत ग्रंथकारांच्या ओळखी, भेटीगांठी होऊन त्यांना कोणकोणत्या अडचणी येतात यांचा खल व्हावा अशासारखे हेतु होते. अर्थातच त्यांना तोंपर्यंत व्यवस्थितपणा वा कृतिक्षमता आलेली नव्हती. त्यामुळे त्यांच्यांतील अध्यक्षीय भाषणें ग्रथित झालेलींहि कोठे आढळत नाहींत. किंबहुना तशीं कांही भाषणें मूळांतच झालीं तरी होतीं की नाही याविषयी शंकाच आहे. अशा स्थितींत त्या भाषणांना मुळांतच तितकेसें महत्त्व अुरत नाही.

१९०६ मध्ये संमेलनाचें तिसरें अधिवेशन भरलें व त्यावेळीं अैतिहासिक कागदपत्रांचा संग्रह प्रसिद्ध करणें, त्याप्रमाणे मुंबअी विद्यापीठांत मराठीचा प्रवेश करून घेणें, आधुनिक कवींना अुत्तेजन

देणें व मराठींत विश्वकोश वा भाषेचा कोश रचणें अि० गोष्टींची चर्चा झाली. त्यांपैकी बऱ्याचशा गोष्टी यापूर्वी प्रत्यक्ष चालू असलेल्या हालचालींच्या प्रतिध्वनिरूपच होत्या असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही; अुदा० अितिहासाचार्य राजवाडे यांच्या 'मराठ्यांच्या अितिहासाचीं साधनें' या अैतिहासिक पत्रसंग्रहाचे त्या वेळेपर्यंत निदान आठ खंड प्रसिद्ध होअून गेलेले होते. आणि मराठीला विद्यापीठांत प्रवेश मिळविण्याविषयीची हालचाल तर न्या. मू. रानडे यांच्या वेळेपासूनच चाललेली असल्याचें सुप्रसिद्धच आहे.

पुढील वर्षी वि. मो. महाजनि यांच्या अध्यक्षतेखाली चवथें अधिवेशन भरलें. त्यांत अध्यक्षांनी ठिकठिकाणीं पसरलेल्या दोन कोटि महाराष्ट्रीयांनी अेक व्हावें, लोकांत साक्षरतेचा प्रचार करून वाङ्मयाविषयींची अभिरुचि ग्रंथकारांनी अुत्पन्न करावी नि वाढवावी असा अुपदेश केला. पौरस्त्य-पाश्चात्य झगड्यांत आपण जपानचें अुदाहरण पुढें ठेवावें अशीहि अेक सूचना त्यांनी त्यांत केली आहे ती बहुधा त्या वेळच्या जपानच्या सर्वत्र गाजत असलेल्या प्रभावाचा परिणाम होती हें स्पष्ट आहे.

१९०८ च्या पुण्याच्या अधिवेशनाचे अध्यक्ष भारताचार्य चिं. वि. वैद्य हे होते. त्यांचें भाषण मात्र खऱ्या ग्रंथकारास साजेसें झालें. कारण त्यांत त्यांनी मराठी भाषेच्या भौगोलिक व्याप्तीचा, तिच्या मूळाचा, अैतिहासिक संशोधनात्मक दृष्टीने विचार केला. महाराष्ट्राच्या निरनिराळ्या विभागांस (विदर्भ, कोकण अि. स.) जुन्या ग्रंथांमध्ये केव्हापासून आधार सापडतो अित्यादि विवेचन करून पुढे मराठी भाषेच्या अुत्पत्तिकाळाची व घटनेचीसुद्धा चर्चा त्यांनी केली आहे. शेवटीं आतापर्यंतच्या वाङ्मयाचा आढावा स्थूलरूपाने घेतला आहे. 'ग्रंथकारांच्या संमेलना'च्या कल्पनेचा बहुतेक येथून पुढे अस्त झालेला दिसतो. कारण त्यापुढे त्यास 'महाराष्ट्र साहित्य संमेलन' असें सार्थ नामाभिधान प्राप्त झालें, व त्याचे क्रमांक मात्र पूर्वीचेच धरून तें पुढे चालू झालें.

सहावें अधिवेशन बडोदें येथें डॉ. कान्होबा र. कीर्तिकर यांचे अध्यक्षतेखाली भरलें. त्यांचें भाषण ठराविक साच्याचेंच झालें, अितकेंच नव्हे तर त्या अधिवेशनांत डॉ. भांडारकर, रा. ब. वैद्य, गो. कृ. देवधर अि.चीं जीं निरनिराळ्या विषयांवर स्वतंत्र भाषणें झालीं, तींच विशेष अुठावाचीं झाल्यामुळे कीर्तिकरांच्या अध्यक्षीय भाषणाला अेक प्रकारचें गौणत्व प्राप्त झालें.

त्यापुढचें सातवें संमेलन तीन वर्षांनी १९१२ त अकोलें येथे झालें, व तें मात्र बरेंच संस्मरणीय झालें. संमेलनास येथवर जें केवळ औपचारिक स्वरूप होतें त्याच्या जागीं 'महाराष्ट्र साहित्य परिषदे'ची स्थापना व तिचें ध्येय, कार्य, अि.ची निश्चिति, त्यांच्या योगाने त्याला रीतसर स्वरूप येण्याचा पाया घातला गेला हेंच त्या संस्मरणीयतेचें मुख्य कारण होय. त्या वर्षी प्रसिद्ध कादंबरीकार हरिभाअू आपटे हे अध्यक्ष असून त्यांचें भाषण त्यांच्या लौकिकास साजेसेंच झालें. त्यांत विचारांची विशालता आहे, आवश्यक तेवढी विद्वत्ता आहे. मायबोलीविषयीचा जाज्वल्य अभिमान आहे व त्यापोटीं आलेली कैवाराची भूमिका पण आहेच. प्रथम अुपनिषदांतील अुतारा देअून 'शब्दब्रह्म, नादब्रह्म व वाग्ब्रह्म' यांची चर्चा केली आहे. नंतर वाङ्मयाच्या स्वरूपाचें विवेचन करून 'मराठी भाषेची पीछेहाट होत आहे या आक्षेपास अुत्तर देण्यास सुरवात केली आहे. तत्पूर्वी आक्षेपकांचे वर्ग कल्पून कोणत्या वर्गास हें अुत्तर आहे ह्याचाहि खुलासा केला आहे. मराठींत वाङ्मयाची अुन्नति होत आहे हें दाखवितांना बाह्योन्नति व अंतरुन्नति असे अुन्नतीचे भाग केले, व त्या दोन्ही अंगांची मराठींत अुन्नति कशी होत आहे तें सोदाहरण पटविलें. पुष्टयर्थ अिंग्रजी ग्रंथकारांचीं पण अुदाहरणें दिलीं आहेत. तसेंच ही द्विविध अुन्नति झाली तीसुद्धा सरकारकडून, विद्यालयाकडून, अुत्तेजन नसतांना व भाविकांची संख्या कमी असतांच झालेली आहे; व म्हणूनच ती अभिनंदनीय आहे असें स्पष्ट मांडलें आहे. पुस्तकांचे आंकडेसुद्धा मतपुष्टयर्थ दिले आहेत. नंतर समकालीन ग्रंथकारांची स्थिति पूर्वकालीन ग्रंथकारांच्या स्थितीपेक्षा कशी केविलवाणी असते, त्यांचे कष्ट कसे वाढत जातात, हें दाखवून भूतकालप्रेमी व वर्तमानविद्वेषी लोक सर्व काळीं असणारच, तेव्हा त्यांच्याकडे

लक्ष न पुरविलें तरी चालेल असें सांगितलें. आक्षेपकांचा दुसरा मुद्दा म्हणजे चांगलीं पुस्तकें कमी निघतात. त्याचें निरसन जगाच्या नेहमींच्याच वाङ्मयाची ही स्थिति आहे, तेव्हा हा आक्षेप केवळ मराठीवरच येतो असें नाहीं, अशा अुत्तराने केलें आहे. (There are few voices and many echoes याहि म्हणीचा आधार दिला आहे.) त्यापुढे त्यांनी शब्दसिद्धीचा प्रश्न विचारांत घेतला. त्यांच्या मतांचें विशेष परीक्षण पुढे येअीलच, परंतु परभाषेंतले शब्द आणण्यास त्यांचा विरोध नाही. शेवटीं तीन चार मरीव सूचना करून अुपनिषदाच्या अुताऱ्यानेच त्यांनी आपलें भाषण संपविलें आहे. सर्व व्याख्यानांत तळमळ व जिव्हाळा ओथंबून वाहत आहे.

यानंतर तीन वर्षांनी १९१५ मध्ये श्रीमंत बाळासाहेब मिरजकर यांच्या अध्यक्षतेखाली मुंबअीस अधिवेशन भरलें. त्यांच्या छोटेखानी वक्तव्यास भाषण म्हणतां येअील की काय हीच शंका आहे. बादशहांचें शुभचिन्तन दोनदा करून जुन्या ग्रंथांपैकी अेका तरी ग्रंथाचा नैष्ठिक अभ्यास करण्याची आधुनिक विद्वानांस त्यांनी प्रार्थना केली. तसेंच आपल्याजवळ भगवद्गीतेचे . पत्र्याचे ठसे असल्याचा पण शेवटीं अुल्लेख केला आहे.

१९१७ या वर्षी अिंदूर येथे ग. ज. आगाशे यांचे अध्यक्षतेखालीं संमेलनाचें नववें अधिवेशन भरलें. त्यांतील अध्यक्षांचें भाषण वरील भाषणापेक्षाहि अेका दृष्टीने अधिकच मजेशीर वाटतें. अध्यक्षांनी प्रारंभीं श्रीमंत सयाजीराव, अिंदूरकर व सरकार यांची स्तुति करून दोस्त राष्ट्रांना यश चिंतिल्यानंतर मग विषय म्हणून मागील संमेलनांतील कांही ठरावांवर आपलें मत देण्यास सुरवात केली. विद्यापीठांतून त्या वेळीं मराठीची हकालपट्टी झाली होती. न्या. मू. रानड्यांनी मराठीचा प्रवेश अत्यंत परिश्रमपूर्वक करून घेतला, व तसे परिश्रम करावयाचे तर युनिव्हर्सिटीच्या 'फेलो'ना समजण्यासाठीं अिंग्रजींतून मराठी वाङ्मयाच्या ओळखीवर पुस्तकें प्रसिद्ध करावींत म्हणजे 'सुज्ञ' 'फेलो' आपोआपच तो विचार करतील. कारण 'व्हाइस चॅन्सेलर' डॉ. मॅकक्किन् हे अत्यंत अुदार आहेत अि. गोष्टी सांगून त्यांचीहि स्तुति आगाशांनी भरपूर केली !! यापुढे मुलांमुलींसाठीं क्रमिक पुस्तकें तयार करावींत असा एक ठराव १९१५ चे अधिवेशनांत संमत झाला होता त्याचा निर्देश करून तसा प्रयत्न करूं नये असें आगाशे यांनी सुचविलें. कारण पुस्तकें छापण्यास आपणांजवळ पैसा नाही, व कोणी तीं छापून काढलीं, व तीं सरकारने मंजूर केलीं नाहीत, तर निष्कारण खर्च मात्र होईल म्हणून ती कल्पना डोक्यांतून काढून टाकावी असें पर्यायाने सुचविलें आहे. सरकारी परीक्षणें जास्त चिकित्सक यावींत असा आशावाद व्यक्त करून ग्रंथप्रकाशनाच्या अुत्तेजनासाठी फ्रान्समधील अेका ॲकॅडमीचा अितिहास व कार्य यांचें लांबलचक वर्णन करून तशी योजना येथे अस्तित्वांत आणावी असें सुचविलें. नंतर युद्ध सुरू आहे तोंपर्यंत 'पॉप्युलर अेज्युकेशन' सारख्या माला निर्माण करून राज्यकर्त्यांस मदत करूं या अशी सदिच्छा व्यक्त केली आहे. शेवटीं सयमक-निर्यमक वादाचा परामर्श सोल्लेख घेअून निर्यमक काव्य प्रतिभासंपन्न कवींनेच हातीं घ्यावें, तोंपर्यंत अितरांनी सयमकच रचना करावी असा अुपदेश केला आहे.

**थोडेंसें समालोचनः—** येवढ्या माहितीवरून प्रथमयुद्धपूर्वकालीन साहित्यविषयक चळवळींची योग्य कल्पना येअूं शकेल. त्या वेळच्या हालचालींवरून पुस्तकप्रसिद्धीबाबतचे तरी प्रयत्न होत असावेत, म्हणजे त्या बाबतींत तरी 'स्वातंत्र्य' असावें अशी कोणाची कल्पना असेल तर ती साफ चूक आहे. १९०९ च्या बडोदा येथील संमेलनांतील अेका ठरावाचा "**प्रकृत राजप्रकरणीं, व वादविषयक धार्मिक, सामाजिक प्रश्न वगळून** अितर सर्व विषयांवर व कलांवर नवीन ग्रंथ तयार करणें किंवा अन्य भाषांतील ग्रंथांची भाषांचीं भाषांतरें करणें" हा भाग पाहिल्यास त्यावरून त्या 'स्वातंत्र्या'विषयी योग्य ती कल्पना येण्यासारखी आहे. साहित्यिकच जेथे आपण होअून ग्रंथकर्तृत्वावर असा दंडक घालून घेण्यास प्रवृत्त होतात, तेथे साहित्यविषयक चळवळींत सामर्थ्याचा जिवन्तपणा आला नाही तर त्यांत नवल नाही.

**युद्धोत्तरकालः—** यापुढील संमेलन १९२१ मध्ये बडोदें येथे साहित्यसम्राट् तात्याराव केळकर यांचे अध्यक्षतेखाली भरलें. हें संमेलन अनेक दृष्टींनी क्रांतिकारक म्हणून गणावें लागेल. गेल्या महायुद्धानंतर बदललेल्या परिस्थितीचें प्रतिबिंब त्या वेळच्या अध्यक्षांच्या भाषणांत आपणांस अवश्य दिसून येतें. लोकशाहीच्या हक्कांची वाढ झाल्याने राजनिष्ठेला ओहटी लागलेली दिसते. तसेंच शुद्ध स्वरूपाच्या वाङ्मयाचे पुष्कळसे गुण त्यांत आहेत. पण असें असलें तरीसुद्धा अुपरिनिर्दिष्ट ठरावाच्या मूळाशीं असणारा राजकीय परिस्थितिनिरपेक्षतेचा अलिखित संकेत नकळत— वा बुद्धयाहि— त्यांत पाळला गेला आहे, असें स्पष्टपणें प्रतीत होतें.

मराठी वाङ्मयाची वाढ होत आहे हें केळकरांनी युनिव्हर्सिटींत मराठीस मान मिळत आहे व 'राष्ट्रीय सभे'ने भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व मान्य केलें आहे, हीं दोन गमकें घेअून दर्शविलें आहे. स्वतंत्र विद्यापीठाचें सूतोवाच केळकरांनी प्रथम त्या भाषणांत केलें. (प्रा. पोतदारांचे त्या संबंधांतले प्रयत्न ह्या वर्षापासूनच सुरू झाले आहेत हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे.) नंतर मुख्य मुख्य ग्रंथांचा शाखाशः समाचार घेअून आधुनिक कवितेच्या गुणदोषांचें विवेचन त्यांनी केलें आहे. त्यांत 'भावगीता'च्या (त्यांनी वीणाकाव्य म्हटलें आहे) विवरणावरच विशेष भर दिलेला असून अेकूण समालोचनाने भाषणाचा बराच भाग व्यापिला आहे. पुढें आधुनिक ग्रंथकारांबद्दलच्या गैरसमजाचें निराकरण पाश्चात्य लेखकांचे अुतारे घेअून केलें आहे. प्रत्येक युगांत अशा वृत्तीचे लोक असतात असें सांगून मराठी लेखकांची अिंग्रजी व जुन्या मराठी लेखक-कवींबरोबर तुलना केली आहे. त्यानंतर 'वाङ्मय म्हणजे काय' हा तात्त्विक प्रश्न विचारांत घेअून काळाच्या चाळणींतून जें शिल्लक राहातें तें वाङ्मय असें विधान केलें आहे. शेवटीं वाङ्मयाची कसोटी कोणती, हेतु काय, मेकॉलेच्या काव्याविषयींच्या मताचा समाचार, व काव्यापासून आनंद कां, कसा होतो अित्यादि गोष्टींची बरीच मूलगामी स्वरूपाची चर्चा केली आहे.

अकरावें अधिवेशन मुंबअीस किब्यांचे अध्यक्षतेखालीं १९२६त भरलें. त्या वेळच्या भाषणांत अध्यक्षांनी महाराष्ट्राबाहेरील विद्यापीठांत मराठीस स्थान मिळत आहे याबद्दल संतोष व्यक्त करून टराविक समालोचनानंतर सारस्वत, साहित्य, वाङ्मय यांच्या व्याख्या करण्याचा प्रयत्न केला आहे. शेवटीं वृत्तपत्राच्या संपादकाच्या कार्याचें महत्त्व वर्णन करून समकालीन वृत्तपत्रांतील अभिरुचिहीन लेखनाबद्दल नापसंति व्यक्त केली आहे. शेवटीं अेका ॲकॅडेमीची कल्पना सांगून तें स्वरूप म. सा. परिषदेस द्यावें अशी शिफारस केली आहे, व ती करतांना अिंग्रजीसुद्धा या अवस्थेंतून गेली असल्याचें कारण दिलें आहे.

१९२७ चें श्री. कोल्हटकरांचें व्याख्यान अत्यंत संस्मरणीय गणावें लागेल. त्यांच्या व आपट्यांच्या भाषणांत अेका गोष्टींत साम्य आढळतें. ह्या भाषणापूर्वी नुकताच राजवाडे यांनी शारदोपासक संमेलनांतील अध्यक्षीय व्याख्यानांत 'मराठी भाषा मुमूर्षु झाली आहे' असा आक्षेप घेतला होता. मराठीचें आजचें दौर्बल्य हें बाल्याचें निदर्शक नसून वार्धक्याचें आहे, आणि ती लवकरच मृत पावणार आहे, तेव्हा सुज्ञ लोकांची तिला वांचविण्याची अुठाठेव फुकट जाणार आहे, असे विचार मांडले होते. राजवाड्यांसारख्या 'मराठीविना इतर भाषेंत अेक अक्षरहि लिहिणार नाहीं' अशी प्रतिज्ञा करणाऱ्या लेखकाच्या ह्या बलवत्तर नि निराशाजनक आक्षेपांचा विचार करणें श्रीपाद कृष्णांना भाग पडलें. त्यांनी प्रथम राजवाड्यांच्या आक्षेपाचें अधिष्ठान म्हणजे जें दैनंदिन व्यवहारांतील अिंग्रजी शब्दांचें बाहुल्य, त्यावरच आपलें निराकरणाचें हत्यार चालविलें. अिंग्रजी राजवट सुरू झाल्यावर विद्यालयांत चवथीपासून पुढे तीच बोधभाषा झाली असल्याने नि अिंग्रजांचेंच राज्य चालू असल्याने, त्यांच्या भाषेचें वर्चस्व राहणें कसें अपरिहार्य होतें याचें त्यांचें सामाजिक विवेचन अतंत मार्मिक आहे. पण त्याचबरोबर, 'डाडा', 'थॅंड्यू', 'टाई', 'गॅग्यू' इ. विचित्र रूपें आणण्याच्या प्रवृत्तीचा निषेध करण्यासहि ते विसरले नाहीत. मराठीला विद्यापीठांत प्रवेश नसल्याने तिच्यांत ग्रंथ निर्माण

होत नाहीत, व अुत्तम ग्रंथ निर्माण होत नाहीत म्हणून तिला विद्यापीठांत मान नाही हें परस्परावलंबी कोडें मांडून सरकार नि विद्यापीठ या दोघांचीहि मराठीवर वक्रदृष्टि कशी आहे, आमच्याकडील विद्वानांनी सुद्धा अिंग्रजींतून ग्रंथनिष्पत्ति कशी केली अित्यादि गोष्टी विशद केल्या आहेत. तसेंच, पुष्कळशा कल्पना व वस्तु नवीन असल्याने त्यांचे वाचक जे शब्द असतील ते परके असले तरी येणारच, आणि पत्र लेखनांतून सुद्धा अिंग्रजी शब्दांची आयात होअूं लागली आहे हें दाखविलें आहे. शास्त्रीय दृष्ट्या भाषा केव्हा मुमूर्षु म्हणतां येईल यासंबंधीं विचार करतां दिसून येणारीं चार पांच गमकें सुद्धा मराठीस कशीं लागू पडत नाहीत हें सविस्तर प्रदिपादिलें आहे आणि शेवटीं राजवाड्यांचा आक्षेप निराधार ठरविला आहे. पण ही प्रगति डुरळून जाण्याअितकी नाही अशी जागीच सूचना देअून मग ते शब्दशुद्धीच्या विचाराकडे वळले आहेत. त्या संबंधांत अिंग्रजी शब्दांबद्दल दुसरे पर्याय योजावेत, परंतु आरबी फारशी शब्द मात्र काढतां येणार नाहीत. कारण ते पूर्ण रुळले आहेत ते काढून टाकले तर कदाचित् व्यक्तीकरणास अडचण होईल, शिवाय ते पूर्णपणें रुळले आहेत, व ते मराठीचे नियम पाळतात असें त्यांनी आपलें मत प्रतिपादिलें आहे. अेकूण प्रतिपादनकौशल्य, तर्कशुद्धता, भाषासौष्ठव इ. दृष्टींनी श्रीपाद कृष्णांचें भाषण अुल्लेखनीय वाटतें. वरकरणी त्यांचा विषय जरी तात्कालिक असला तरी त्यांतील विवेचन मात्र सार्वकालिक आहे.

त्यापुढील वर्षी ग्वाल्हेरला लोकनायक मा. श्री. अणे हे अध्यक्ष होते. त्यांनी वर्गवारीने सविस्तर वाङ्मयाचा समालोचनात्मक आढावा घेतला आहे. कादंबरीलेखकांची तरफदारी पण त्यांना करावीशी वाटली. शेवटीं समयक-निर्यमक वादाबाबत स्वतःचें मत- प्रतिभासंपन्न कवींनीच निर्यमक प्रकार हाताळावा हें-सांगून राजवाड्यांच्या आक्षेपास कोल्हटकरांनी योग्य अुत्तर दिलें असें म्हटलें आहे. शुद्धलेखन व लिपिसुधारणा या गोष्टींचा विचार करण्यासाठी समित्या नेमून त्यांचा निर्णय बंधनकारक मानावा असें सुचविलें आहे.

यापुढे सामाजिक व भाषाविषयक जागृति बऱ्याच प्रमाणांत व्हावयास लागली असें दिसतें. परभाषांच्या आक्रमणाची जाणीव तीव्रतेने होअूं लागली आणि मराठीच्या स्वतःच्या क्षेत्रांत तरी तिला जिवंत ठेवावयास हवी अशी आवश्यकता निर्माण झाली. राष्ट्रीय जागृतीमुळे हा फरक पडणें अपरिहार्य होतें. आजपर्यंतचीं अधिवेशनें मराठीच्या माहेरीं झालीं, परंतु सीमाप्रांतावरची 'मराठी' जेव्हा 'माहेरीं' येअूं लागली, तेव्हा मात्र सीमाप्रांताचें अस्तित्व अुघडपणें दाखवावें लागलें; व म्हणून यापुढे बेळगांव, गोंवें, हैदराबाद (दक्षिण) या ठिकाणीं अधिवेशनें भरलीं. कारण तत्प्रांतीय भाषेचें वा अितरहि आक्रमण मराठीवर होत होतें, त्याचा प्रतिकार करणें राहिलें, तरी निदान त्याविषयीची जाणीव दाखविणें तरी आवश्यक होतें.

चवदावें अधिवेशन शिवरामपंत परांजपे यांच्या अध्यक्षतेखाली बेळगांव येथे भरलें. त्यांच्या भाषणांत त्यांची प्रसिद्धि ज्या कारणांसाठी आहे ते अुपरोध, राष्ट्रीय भावना, व्याजोक्ति अि. गुण प्रकर्षाने आढळून येत नाहीत. प्रथम त्यांनी साहित्यसंमेलनाचा अितिहास, कार्य अि.ची चर्चा करून भाषा व शिक्षण यांचा प्रसार कोणत्या कारणांमुळे होतो यांचें विवेचन केलें, आणि हिंदुस्थानांत तरी नागरी लिपीचा प्रसार होणें कसें हितावह आहे हें रोमन लिपीच्या अुदाहरणांवरून दाखविलें. शब्दशुद्धीचाहि थोडासा विचार त्यांनी केला आहे. त्यांच्या मतें अितर भाषांतील शब्द घेअून भाषा संपन्न होते, परंतु जर अेखाद्या भाषेविषयीं लोकांत अनादर असेल तर प्रश्न वेगळा. सरकारजमा पुस्तकें, रससंख्या, समयक-निर्यमक कविता अि. विषयांचा समाचार घेअून अनुस्वार, शुद्धलेखन, मोडी व नागरी लिपी यांचेंहि पुनरुज्जीवन वा संवर्धन व्हावयास हवें, असें त्यांनी प्रतिपादिलें असून शेवटीं नवीन पुस्तकांचा अुल्लेख चमत्कृतिपूर्ण रीतीने, त्यांचीं नांवें वाक्यांत योजून केलेला आहे.

मडगांवला झालेलें वा. म. जोशी यांचें अध्यक्षीय भाषण कितीतरी विषयांचा समाचार घेणारें झालें आहे. तें वाचतांना त्यांचें केळकरांच्या भाषणाशीं असलेलें साम्य पाहून कदाचित् जोशांपुढे तें भाषण आदर्श म्हणून व टीकाविषय म्हणूनहि असावें अशी शंका येते. भाषण अितकें प्रदीर्घ आहे की स्वतः लेखकाला त्याची जाणीव पुनः पुनः करून द्यावी लागलेली आहे. भाषणांत आलेले विषय दोन भागांत विभागतां येतील. पहिल्या विभागांत त्यांनी केलेलें वाङ्मयाचें वर्गीकरण पडेल. अुत्कृष्ट वाङ्मयांत सत्य, शिव, सौंदर्य हे गुण अत्यवश्य आहेत हें प्रतिपादून वाङ्मयीन सत्य, करुण-रसापासून होत असलेला आनंद, काव्यानंदाची चिकित्सा अि. विषय खूप विस्ताराने विवेचिले आहेत. त्यांचें विवेचन बरेंच पांडित्यपूर्ण, मार्मिक नि मूलग्राही आहे.

शुद्धलेखनाच्या चळवळीचा अुल्लेख करून भाषाशुद्धीच्या बाबतींत कोल्हटकरांचें मत आपणांस ग्राह्य असल्याचें त्यांनी सांगितलें आहे. कारण वाङ्मयाचा व्याप वाढल्यावर आपोआपच शब्द निर्माण होतील असा त्यांना विश्वास आहे. शेवटीं साहित्यिकांना साहस करण्याचा पण अुपदेश दिला आहे. दुसरा विभाग वाङ्मयाच्या समालोचनाचा असून तें समालोचन त्यांनी सोदाहरण व अतिशय विस्तारपूर्वक केलें आहे.

१९३१ मध्ये ही साहित्यिकांची स्वारी भागानगरावर गेली होती. तेथे अध्यक्ष मात्र अतिशय विद्वान् गृहस्थ लाभले. डॉ. केतकर हे तेथे अध्यक्ष होते. त्यांचें भाषण अत्यंत सडेतोड, स्पष्ट व कळ-कळीचें झालें आहे. त्यांतील विचारांची मूलभूतता वा आधुनिकता आजहि मनाला मोह पाडते. त्या भाषणाला एक प्रकारचें सार्वकालिकहि महत्त्व आहे. समालोचनाचें काम आपण करणार नाहीं हें स्पष्टपणें सांगून राजकीय परिस्थितीची चर्चा त्यांनी आपल्या सबंध भाषणभर केली आहे. भाषेचा प्रांतसुद्धा समाजकारण व राजकारण यांपासून भिन्न नाही हें प्रथम त्यांनीच धडाडीने बोलून दाख-विलें. त्यांना भाषेच्या अलंकरणापेक्षा अस्तित्वाचा प्रश्न महत्त्वाचा वाटला व त्यांनी तोच विचारांत घेतला. यानंतर हिंदी संस्थानें कशीं दुर्बल आहेत, त्यांना कोणतेंच कार्य करतां येणें कसें शक्य नाही, लोक जागृत न होण्याचीच पोटभरू नोकर कशी काळजी घेतात इ. राजनैतिक दंभस्फोट त्यांनी अत्यंत सडेतोड रीतीने केला. त्याचप्रमाणे राजाची भाषा कोणती असते याचें सोदाहरण स्पष्टीकरण देअून प्रजेची भाषा तीच राजाची भाषा असा निजामसाहेबांस कळकळीचा सल्ला दिला. विवेचनाच्या मूलभूततेमुळे कितीहि काळ लोटला तरी त्या भाषणाची नवीनता अढळच राहील यांत शंका नाही.

यानंतरचीं चार पांच भाषणें ठराविक सांचाचीं झालीं. कारण त्यांत कसलेला साहित्यिक कोणीच नव्हता. एक खाडिलकर याला अपवाद आहेत. परंतु त्यांनी आपल्या भाषणांत ज्ञानेश्वरी-तील व गीतारहस्यांतील तत्त्वविवेचनास प्राधान्य दिलें. गीतारहस्य व ज्ञानेश्वरी यांचें लोकसंग्रहाचे बाबतींत साम्य आहे. त्यांच्या भाषणांतील मुख्य विचार म्हणजे 'ज्ञानेश्वरीचें कालांतर, स्थलांतर, भाषांतर म्हणजेच गीतारहस्य' हा आहे. त्या ग्रंथाची विशेष स्तुति त्यांनी केली आहे. तसेंच महाराष्ट्र विद्यापीठ कधीं तरी येअील असा विश्वास प्रकट करून त्या चळवळीकरिता प्रा. पोतदारांचें त्यांनी अभिनंदन केलें आहे. शेवटीं स्वकालीन वाङ्मयाचा आढावाहि थोडक्यांत घेतला आहे.

श्रीमंत सयाजीराव व औंधकर यांत सयाजीरावांचें भाषण बरें आहे. त्यांनी मराठी सारस्वताचा युगशः नि सविस्तर आढावा घेअून आधुनिक वाङ्मयांत जनतेच्या गाऱ्हाण्यांपेक्षा मुंबईपुण्याकडील मध्यमवर्गीय लोकांच्या गाऱ्हाण्यांस तेवढा वाव मिळतो अशी तक्रार केली आहे. शेवटीं एका ॲकॅडेमीची कल्पना विशद करून महाराष्ट्र विद्यापीठाच्या कार्याचें दिग्दर्शन केलें आहे.

श्रीमंत औंधकरांचें भाषण खूपच लांबलें आहे. त्यांनी भरपूर अुपदेश केला आहे. तथापि त्यांत साहित्यविषयक महत्त्वाचा भाग अगदीच अल्प आहे. त्यांना सर्वांगीण अुन्नतीची तीव्र अुत्कंठा लागली आहे व तें सर्व कार्य साहित्याच्या संमेलनाने करावें असें त्यांनी सुचविलें आहे. ग्रामोद्धारापासून

तों ललितकलांच्या अुद्धारापर्यंत, निरनिराळ्या वैज्ञानिक शाखांत ग्रंथ निर्माण करण्यापासून तों नाट्य-शास्त्राच्या अितिहासाच्या पारितोषिकदानापर्यंतचें सारें कार्य संमेलनानें करावें असें त्यांना वाटतें. संमेलनाला त्यांनी प्रतिसरकार समजून हा अुपदेश पाजला आहे. 'शिक्षणाची हेळसांड होते, म्हणून चांगलीं पुस्तकें काढावींत म्हणजे थोड्या दिवसांत बेकारी नष्ट होअील' या त्यांच्या एका मतावरून त्यांच्या त्या साऱ्या अुपदेशाची कल्पना येईल.

१९३४ मध्ये ना. गो. चापेकर यांनी बडोदें संमेलनाच्या अध्यक्षस्थानावरून जें भाषण केलें त्यांत त्यांनी लिपिशुद्धीची थोडी चिकित्सा करून पुढील कामगिरी मंडळाकडे सोपवावी असें सुचविलें. नंतर ज्ञानाच्या स्वरूपाची थोडी चर्चा करून वाङ्मयाचें विज्ञानशास्त्रें व समाजशास्त्रें असें वर्गीकरण केलें आहे. त्यानंतर अलंकार, काव्यानंद, स्फूर्ति, भावना अित्यादींवर थोडें थोडें लिहून विस्तारानें वाङ्मयाचें समालोचन केलें आहे. तसेंच अुसन्या विचारांचा नवमतवाद्यांवर आक्षेप करून ग्रंथपरीक्षणाचे बाबतींत कशी अनास्था होते हें निदर्शनास आणिलें आहे. मराठी विद्यापीठा-संबंधी अगदींच वेगळ्या प्रकारचे विचार त्यांनी प्रकट केलेले आहेत.

**आधुनिक विद्वानांचा समावेशः**— १९३६ पासून साहित्यक्षेत्रांत नवीन युगास प्रारंभ झाला असें दिसतें. कारण त्या वर्षापासून नवीन पिढींतील विद्वानांना अध्यक्षपदाचा मान मिळूं लागला त्याचा परिणाम साहित्यक्षेत्रांत नवीन वारें खेळावयास लागण्यांत झाला. यापुढील अध्यक्ष कोणत्यातरी चळवळींचे पुरस्कर्ते, प्रवर्तक वा विशिष्ट विचारप्रणालींचे अभिमानी असे आहेत.

डॉ. पटवर्धनांनी स्वतःला अत्यंत जिव्हाळ्याचा वाटणारा विषय अधिकारवाणीनें मांडला. त्यांनी भाषाशुद्धीवर घेतल्या जाणाऱ्या निरनिराळ्या आक्षेपांचें निराकरण केलें आहे. राष्ट्रैक्यास ही चळवळ विरोधी नाही असें दाखवून या संबंधांत धर्मभेदाचासुद्धा प्रश्न अुद्भवत नाहीं असे सांगितलें आहे. चिपळूणकरांच्या तद्विषयक मतांचा सादर समाचार घेऊन धुरंधर लेखकांची ढिलाअी या भाषाविषयक शैथिल्याला कशी कारणीभूत आहे हें पटवून दिलें. स्वाभिमानशून्यतेबद्दल त्यांना पदोपदीं वाअीट वाटतें, 'जुन्या शब्दांमागे जे संकेत अुभे असतात ते नवीन शब्दांमागे नसतात' या विरोधकांच्या आक्षेपाचें 'ते शब्द अुपयोगांत आणा, संकेत आपोआप मागून निर्माण होतील' असें निराकरण त्यांनी केलें आहे. त्याचप्रमाणे भाषाशुद्धिवाद्यांची भाषा दुर्बोध व सौंदर्यहीन असते (शब्दविषयक अट्टाहासामुळे हे दोष येतात) या आक्षेपाचें निरसन 'प्रसन्न गद्य लिहिणारांनी नवीन शब्द निर्माण करावेत, त्याला आमचा विरोध नाहीं', असें केलें आहे. स्वकीय शब्द निव्वळ हलगर्जी-पणामुळे कसे मरतात, व तसे मेल्यानें त्या शब्दांमागे अुभी असलेली संस्कृति, परंपरा कशी भंग पावते हें पटवून दिलें आहे. अिंग्रजी लेखक विदग्ध वाङ्मयांत परकीय शब्द आणीत नाहीत, शिष्ट भाषेंत त्यांना स्थान नाही अि. अुल्लेख करून ह्या विषयावर नवीनच प्रकाश पाडला आहे. विवेचनांत पुष्कळ शब्दांचा अूहापोह केला आहे.

बॅ. सावरकरांचा मुंबअी अधिवेशनांतील 'अध्यक्षीय निबन्ध' म्हणजे त्यांच्या भाषाविषयक कार्याचा मूर्तिमंत आढावाच होय. त्यांनी कितीतरी छोट्या पण आवश्यक नि सुकर सुधारणा सुचविल्या आहेत. स्वतः केलेल्या चळवळी रूढ झालेल्या होत्या, त्यांमुळे त्याविरुद्ध आक्षेप जे थोडे होते त्यांस अत्यंत सूत्रबद्धतेनें व आचरणात्मक अुत्तर दिलें आहे. त्यांनी विवेचिलेले मुख्य विषय म्हणजे भाषाशुद्धि, लिपिशुद्धि, राष्ट्रभाषेचा प्रश्न अि. होत. क्रियापददारिद्र्य नष्ट करणें, वाक्यांच्या रचनेंत अर्थानुरोधानें विविधता आणणें अि. मार्मिक, स्वीकार्य व सोप्या सुधारणाहि त्यांनी सुचविल्या आहेत. अर्थ व शब्द यांचाहि विचार करून त्यांचा अुल्लेख करणारा या पंचवीस अधिवेशनांतील हा पहिला नि शेवटलाच अध्यक्ष. पण त्यांचें भाषण गाजलें तें या गोष्टींवरून नव्हे, तर त्यांनी साहित्यिकांना 'लेखण्या टाका व बंदुका घ्या' असा संदेशरूप अुपदेश केला आहे त्यासाठीच. सुभाषचंद्रांनी

रोमन लिपी ही भारताची राष्ट्रलिपी व्हावी असें जें मत व्यक्त केलें होतें त्याला सावरकरांनी कितीतरी सुंदर नि समर्पक अुत्तर दिलें आहे.

प्रा. पोतदारांच्या अहमदनगरच्या अध्यक्षीय भाषणांतील कांही गोष्टींचा अुल्लेख मधून मधून वर आलेलाच आहे. त्यांचें वाङ्मयसमालोचन जंत्रीवजा नाही. तें चिकित्सक बुद्धीवर व प्रांजलपणावर आधारलेलें असल्याने मौलिक स्वरूपाचें वाटतें. मुसलमानी अंमलापुढे आमची भाषा नमली नाही. पण अिंग्रजी अंमलापुढे मात्र तिचा टिकाव लागला नाही. कारण ही सर्वव्यापी क्रांति ही अितर दोन क्रांत्यांपासून सर्वस्वीं भिन्न होती अि. त्यांचें विवेचन मूलग्राही आहे. भारतवर्ष चीन, रूस व अमेरिका या संघराष्ट्रांना अितर लहान राष्ट्रांचे नियम लावणें अयोग्य आहे. त्यांचें अेकात्रयवी राष्ट्रांत रूपान्तर होणें शक्य नाही. तीं संघराष्ट्रेंच राहिलीं पाहिजेत व पुढे अर्थातच येथे असलेल्या संस्कृतीची जोपासना व वर्धन व्हावयास हवें असें प्रतिपादिलें. नंतर विद्यापीठाच्या प्रश्नाची चर्चा करून आपली भाषाविषयक अुद्दिष्टें प्राप्त करून घेण्यास प्रभावी संघटनेची आवश्यकता प्रतिपादून 'या ! मराठीची अिरे धरूं या !' व 'मराठीचा घेंडा मिरवा' असा संदेश दिला आहे. प्रसारक साहित्य, सर्व रसांचें आविष्करण, विचारप्रधान वाङ्मय, प्रतिबन्धमुक्त प्रतिमा अि.ची आवश्यकता पण जातां जातां पुरस्कारिली आहे.

प्रा. फडक्यांचें रत्नागिरीचें अध्यक्षीय भाषण वृत्तपत्रांतून बरेंच गाजलें. त्याचें कारण त्यांनी वृत्तव्यवसायाबाबतची अनास्था विशेष बारकाअीने चर्चिली हेंच होय. त्यांनी हा प्रश्न अध्यक्षीय भाषणाकरिता ठेवण्याअितक्या महत्त्वाचा वाटला असें सांगितलें. ग्रांथिक व वृत्तपत्रीय साहित्य असे विभाग करून दैनंदिन व्यवहाराशीं संबद्ध झालेलें वृत्तपत्रीय साहित्य हें जास्त सकस, विशुद्ध व प्रभावी असण्याची आवश्यकता प्रतिपादिली. वृत्तपत्रांवर ध्येयविहीनतेचा अेक आक्षेप येअून विनोदाच्या नि अश्लीलतेच्या सीमा पुसट झालेल्या आहेत. जाहिरातींत लैंगिकविषयक नि औषधांच्या जाहिरातींचें प्रमाण अधिक आहे, व वृत्तपत्रें गेल्या दहा पंधरा वर्षांत वाढलीं तरी त्यांचें तेज व सामर्थ्य मात्र नष्ट होत आहे असें सांगण्याचा अेकंदर त्यांच्या भाषणाचा रोख आहे. या गोष्टींवर नियंत्रण घालण्यासाठी व अितरहि आक्रमण नष्ट करण्यासाठी, व पुरोगामी नि क्रांतिकारक वाङ्मय निर्माण करण्यासाठी लेखक, वाचक, टीकाकार, संपादक–प्रकाशक अि. ची प्रभावी संघटना हवी असें प्रतिपादून पुरोगामी वाङ्मयाची ओझरती चर्चा जातां जातां केली आहे.

खांडेकरांना ललितवाङ्मयासारखें अत्यंत प्रभावी शस्त्र या तीव्र धामधुमीच्या काळांत आपलें कार्य बजावूं शकत नाही याची टोंचणी अत्यंत तीव्रतेने लागून राहिली आहे, व हें कार्य जर त्याने करावें अशी इच्छा असेल तर अलीकडच्या वाङ्मयाचें दोषदिग्दर्शन व्हावयास हवें या सद्धेतुने अलीकडील कांही ललितग्रंथांची चिकित्साहि त्यांनी केली आहे. साहित्याच्या व्यापकतेच्या दृष्टीने अितर महत्त्वाचे प्रश्न आहेत, परंतु त्यांच्याहिपेक्षा हा प्रश्न जास्त जिव्हाळ्याचा वाटतो व म्हणून मी त्याचा अुल्लेखहि करीत आहें असें त्यांनी म्हटलें आहे. काव्य नि विनोद यांत जें अभिरुचिहीनत्व डोकावूं पाहत आहे त्यावर कडक टीका करून, प्रेम व हास्य यांना जीवनांत असलेलें महत्त्व मान्य करून त्यांचें दिग्दर्शन निरोगी मनोवृत्तीने होण्याची आवश्यकता प्रतिपादिली. त्याचप्रमाणे करुण, वत्सल नि वीर या रसांच्या प्रभावी आविष्कारावर भर देण्याची, लेखकांनी स्वतःच्या व्यक्तिमत्त्वाला सामाजिक अधिष्ठान देण्याची, व नवीन समाजरचनेला योग्य असणारी सामाजिक मनोवृत्ति निर्माण करण्याची, निकड आहे असें कळकळीने सांगितलें आहे. आजच्या लेखनांत मध्यपणाहि नाही नि कलाकुसरहि नाही, हें सांगताना मध्यमवर्गाच्या मनोभूमिकेच्या मालिन्याचें जें मडक, परंतु वास्तवतापूर्ण विवेचन त्यांनी केलें तें लेखकांना निश्चितपणें मार्गदर्शक होईल इतकें शास्त्रीय आहे. दोषदिग्दर्शनांतून स्वतःला अगर स्वतःच्या कृतींना सुद्धा न वगळण्याचा न्यायनिष्ठुरपणा त्यांनी दाखविला आहे. आजच्या ललितवाङ्मयांत असलेल्या अतिरंजकतेचा दंभस्फोट करून तशा प्रकारें बाह्यांगावर संतुष्ट

राहण्याची संवय समाजास मुद्दाम लावण्यांत आली आहे असा आक्षेप त्यांनी घेतला आहे. शेवटीं युद्धाच्या पाशवीपणाचा अुल्लेख करून नव्या जगाचा धर्म, माणुसकी आहे व त्या माणुसकीचा दिव्य संदेश साहित्यिकांनीच समाजापर्यंत पोंचविण्याचें कार्य करावयास हवें असें आग्रहानें प्रतिपादिलें आहे.

**थोडेंसें पुनरालोचन:**— या ओझरत्या आशयावरून साहित्यिकांचाहि दृष्टिकोण प्रारंभीं म्हटल्याप्रमाणे कसा विशाल होत आहे याची साक्ष पटते. या कालखंडांतील भाषणें विद्वत्तेच्या जुन्या निकषानें पाहूं गेलों असतां कांहींना कमी योग्यतेचीं भासतील, पण त्यांतून समाजाभिमुखतेचा सूर वाहत आहे तो निश्चितपणें आशादायक आहे. त्यांचें विवेचनसुद्धा पूर्वकालीन अध्यक्षांप्रमाणे नुसतें मामुली वा औपचारिक स्वरूपाचें नाही, तर तें खऱ्या कळकळीच्या वा पोटतिडिकेच्या योगानें प्रस्फुरित झालेलें आहे आणि म्हणून सामाजिक प्रश्नांना, राष्ट्रीय वा सांस्कृतिक प्रश्नांना, साहित्यांत वाव देण्याचें कार्य जितकें या कालांतील अध्यक्षांनी केलें आहे, तितकें तें त्यापूर्वी क्वचितच झालें आहे. केवळ वाङ्मयगुण व व्यक्तिमत्त्व यांच्या दृष्टीने जरी पाहिलें, तरीसुद्धा त्यांचें जें दर्शन या भाषणांतून होतें तें अत्यंत विलोभनीय वाटावें असेंच आहे.

---

# वैनायक वृत्तासंबंधी थोडी चर्चा—दुसरी बाजू

लें० ना. ग. जोशी

"वैनायक वृत्तासंबंधी थोड्या चर्चे"ची दुसरी बाजू म्हणून पुढील विचार मी मांडीत आहें.

(अ) वैनायक वृत्ताची सावरकरी रचना किती विविध मात्रावलींची आहे त्याचें सविस्तर वर्णन 'म. सा. पत्रिकें'तच (अेप्रिल १९३८) मीं केलें होतें. त्यामध्ये अनेक तऱ्हेच्या 'प्रस्तारां'चा (Permutations) व 'संयोजनां'चा (Combinations) चा विचार केला होता आणि त्यांपैकी 'गाल गाल गाल गाल गाल गालॅ गा' ही रचना फार वेधक आहे व त्याचा प्रयोग सावरकरांनी 'क्रूर लोहपंजरांत या निरुंदशा' वगैरे चरणांत केला आहे, असेंहि नमूद केलें होतें. षण्मात्रिक भृंगावर्तनाचीं हीं विविध रूपें असलीं तरी जाति अेकच आहे. आक्षेपाशीं संबंध आलेल्या तिसऱ्या भृंगावर्तनाचे प्रस्तार असे संभवतात :

(१) भृ । भृ । गाल गाल । गा   (४) भृ । भृ । गा गा गा । गा

(२) ,, ,, लगा लगा । गा   (५) ,, ,, । ल ल ल ल ल ल । गा

(३) ,, ,, गाल लगा । गा

ज्याला अशीं प्रस्तरणें माहीत आहेत त्याला यांतील कुठलेंहि अेकच रूप स्वतंत्र जाति होअूं शकत नाही हें सहज समजून येअील.

'महाराष्ट्रगीत' हें 'काव्यप्रकारा'च्या दृष्टीने 'भावात्मक गीत' (Lyrical song) आहे. यापूर्वीची गोविंद वणीकर, सगनभाअू किंवा परशुरामपंत तात्या गोडबोले यांचीं पदेंहि याच जातिरचनेचीं आहेत व तींहि अशींच गायनप्रधान आहेत. अशा पदांमध्ये गायनाच्या दृष्टीने तिसऱ्या भृंगांतलि

शेवटचें अक्षर ऱ्हस्व टेवून अंतीच्या नियत दीर्घाबरोबर तें गाअिल्यास त्यांत 'लोंच' किंवा 'खटका' येतो. कर्णमधुरतेच्या दृष्टीने ती 'लोंच' अवश्य आहे. म्हणून जुन्या पदांतील व आजच्या महाराष्ट्र-गीतांतील रचना वरील खटक्याचे अंतरे व ध्रुवपद यांनी बांधलेली आहे. पण म्हणून कांही पद्यरचनेच्या दृष्टीने तिचें जातिस्वरूप बदललें नाही. कानीला गोड वाटत नाही म्हणून तें निराळ्याच जातीचें व्यवच्छेदक रूप होत नाही. 'लोंच' किंवा 'खटका' न वापरतां म्हटलें तरी ताल (व राग) बदलतोच असें नाही– व प्रस्तुत ठिकाणीं तो नक्की बदलत नाही.

सारांशाने फार तर अेवढें म्हणतां येअील की, 'महाराष्ट्रगीता'ची मात्रारचना 'वैनायका'च्या विविध प्रस्तारांतील अेक आहे– म्हणजेच तो अेक वैनायकाचा अुपविभाग आहे. गायनसुलभ गीतांत असली रचना गोड म्हणून अुपयुक्त असते. तरी गायनांतहि अुपान्त्य दीर्घयुक्त रचना तालभंग करीत नाही हें गणिताने सिद्ध करतां येतें व म्हणून ती त्याज्यहि नाही, सावरकरांनी (व मीं स्वतः) दोन्ही तऱ्हेने रचना केली व Blank Verse च्या पद्धतीने वाचल्यास कर्णमाधुर्यभंगाचा दोषहि त्यांत भासत नाही. या प्रत्यक्ष सावरकरी व 'जीवनयोगी' प्रयोगावरून व गणित-संगीत-शास्त्राच्या पुराव्यावरून 'महाराष्ट्रगीता'ची जाति निराळी होत नाही.

शिवाय अशा तऱ्हेने जातिस्वरूपें नियत करूं लागलों तर अेक अनवस्था प्रसंग अुद्भवेल. मागेच श्री. भिकाजीपंत जोशी यांनी (म. सा. प. आक्टो. १९३८) मात्रांच्या अेकूण संख्येच्या दृष्टीने (२० मात्रा) वैनायकाशीं जुळतीं अशी अनेक 'वृत्तें' (अक्षरगणी) आहेत असें दाखविलें होतें. तशीं वृत्तें जीं रूढ असतील तीं आहेतच. परंतु 'जाति'स्वरूपांतील प्रत्येक प्रस्ताराला लगत्वबद्ध रचना मानल्यास तो अक्षरबद्ध 'वृत्त'रूप पावेल; व तेवढे प्रस्तार (अेका आवर्तनाचेच नव्हेत, निरनिराळ्या आवर्तनांचेहि) निरनिराळीं 'वृत्तें' होतील! अुपान्त्य ऱ्हस्वाचा नियम मानला तर अुपाद्य ऱ्हस्वाचा कां नको? म्हणून तीहि अेक स्वतंत्र जाति व अशा तऱ्हेने वैनायकाच्या कमींत कमी ९ स्वतंत्र जाति होतील! कै. माधवराव पटवर्धनांनी जातींचें सर्वांत विस्तृत, बहुव्यापक व अव्याप्तिदोषरहित नियमन केलें. तर्कशास्त्रांतील वर्गीकरणाची किंवा विभाजनाची (Classification & Division) जी मर्यादा आहे ती पाळून, 'जाति-व्यक्ति'संबंध (Genus–Species) किंवा 'सामान्य-विशेष'संबंध (General–Particular) पाहून त्याप्रमाणे अधिकांत अधिक 'विशिष्ट' किंवा 'अुप'प्रकारांना 'सामान्य' असें नांव दिलें पाहिजे. प्रस्ताराने संभवणाऱ्या सर्व मात्रावलींना व्यापणारें असें जातिरूप पाहिजे. 'छंदोरचना'कर्त्यांचा प्रयत्न त्या धर्तीचा आहे. त्यांत तार्किक दृष्टीने मला तरी कांही खास 'दोष' असे आढळले नाहीत. श्री. सहस्रबुद्धे यांचें मत मात्र निराळें दिसतें.

(ब) 'रेवती' जातीचा दृष्टान्त देतांना अेक गृहीत धरलेली गोष्ट अशी आहे की कै. माधवरावांनी 'नियत' (नेहमी येणारे, अवश्यमेव) ऱ्हस्वासाठी (˘) अशी खूण वापरली आहे. कै. माधवरावांनी नियत दीर्घासाठी (+) अशी खूण वापरल्याचें स्पष्ट आहे. (˘) या चिन्हाचा 'नियत' ऱ्हस्वासाठीच अुपयोग आहे असें दिसत नाही. आता अशी 'नियत' रूपाची खूण फक्त दीर्घासाठीच कां याचा विचार 'रेवती' चरणाच्या पृथक्करणानेच केल्यास कारण स्पष्ट होअील व मग केवळ गणिताने ऱ्हस्वाचें ऱ्हस्वत्व दाखवितां येअील. या 'रेवती'च्याच लक्षणपद्यांत (+) असें चिन्ह आहे त्याचें स्थान पाहतां कारणहि लक्षांत येअील. ही जाति अेक 'पद' आहे. गातांना कांही प्लुत मात्रा घेतल्या जातात. त्याप्रमाणे पृथक्करण असें होअीलः—

(लक्षणपद्य) 'सौमद्र' ˘ ˘ | – + ˘ – ˘ | – + –– – | ˘ ˘ + ˘ – ˘ | +
रु च | ते का ऽ ती र्थे | या त्रा ऽऽ या | स मं यीं ऽ त्या स | ती

(स्त्री गीत) र ङ | तो हा ऽऽ इ थि | के शी ऽऽ बाइ | मा झा ऽ रा हि | ना

( ,, ) दोन् | प्र ह र ऽ रा त्र | झा ली ऽऽ रू थि | आ ले ऽ मो ज | ना

('शारदा') क धिं | क रि ती ऽ ल ग्न | मा झें ऽऽ तु ज | ठा वें ऽ ई श्व | रा

ज्या ठिकाणीं १ किंवा २ मात्रा प्लुत असेल त्या ठिकाणीं पूर्वीचें अक्षर दीर्घ हवें. म्हणजेच तें 'नियत' (+) असतें. आता वरील चारी अुदाहरणांत शेवटच्या + पूर्वीचें अक्षर ऱ्हस्व आहे. पण तें 'नियत' ऱ्हस्व आहे असें नाही. अुपान्त्य दीर्घाची रचना शक्य आहे, ती गेयहि होअील. त्यामुळे तालभंग किंवा किंवा रागभेद होणार नाही. तें रूढ नाही म्हणून अशक्य आहे असें मानण्याचें कारण नाही. अुदाहरणार्थः––

रुचते काऽतीर्थयात्राऽऽया समयींऽतया ती

कधिं करि तीऽ लग्न माझेंऽऽ तुज ठावेंऽदेयाळा

ज्याला गातां येतें त्यास यांत 'खटका' नाही किंवा 'लोंच' नाही असें वाटेल. पण त्यामुळे तालभंग होत नाही किंवा राग बदलत नाही हें सहज समजेल. कारण एकाच टाळीच्या अवकाशांत येणाऱ्या (प्लुतासह) आठ मात्रांचा प्रस्तार अनेकविध होअील. येथे मात्र शेवटच्या (प्लुत मात्रा घेतल्यास होणाऱ्या) पद्मावर्तनांत १ प्लुत मात्रेनंतर फक्त ३ मात्रांची कूस रहाते व त्यायोगें फक्त दोन रीतीने (—ᵕ) किंवा (ᵕ—) अशीं संयोजनें शक्य आहेत. त्यांत तर्क-गणित-संगीतशास्त्रानुसारहि अगदी निराळें पडण्यासारखें वैशिष्ट्य नाही, दोष तर नाहीच नाही. उपलब्ध गीतांत अुपान्त्य ऱ्हस्व आहे म्हणून तो तसाच असला पाहिजे, तो 'नियत' आहे असें कै. माधवरावांचें म्हणणें दिसत नाही. येथे ऱ्हस्वाची खूण नियत ऱ्हस्वाचीच आहे, असें दिसत नाही व म्हणून तें कांही 'रेवती' जातीचें व्यवच्छेदक रूप नाही. दोन्ही रचना 'रेवती' जातीच्याच म्हणाव्या लागतात.

(क) वरील ठिकाणीं दिसाअूपणें उपान्त्य ऱ्हस्व असतात, परंतु ते नेहमीच तसे पाहिजेत असें नाही. पण अशा कांही मात्रावली आहेत की जेथे अमुक प्रसंगीं ऱ्हस्वच अक्षर येअील. त्यासंबंधी विचार ओघाला आल्यामुळे मांडतों. 'वैनायक' किंवा 'रेवती' व- असलीं स्थळें यांतील प्राणभूत फरक लक्षांत येण्यास तें अुपयोगी पडेल.

चरणान्तीं ३ मात्रांचा गट येअून पुढें कांही मात्रांची कूस (किंवा 'विराम') राहत असेल तर अन्त्य अक्षर विरामामुळे (म्हणजेच अन्त्य प्लुत मात्रांमुळे) नियत दीर्घ येअून त्यापूर्वीचें अक्षर ऱ्हस्वच येणार. अुदाहरणार्थ, 'लीलारति' व 'समुदितमदना' जाति घ्याः

'लीलारति' = गा | गा गा गा गा | गा गा गा गा | ल गा (६ मात्रांचा विराम)

'समुदितमदना' = प | प | प | ल गा (५ मात्रांचा विराम)

येथे अन्यतालकाच्या ३ मात्रा आहेत. अुलट 'वैनायक' व 'रेवती' (प्लुतयुक्त घेतल्यास) अन्त्यतालकांत फक्त २ मात्रा आहेत. त्यांपूर्वीच्या आवर्तनाशीं याचा संबंध नाही. त्याचीं 'प्रस्तरणें' स्वतंत्र होतात. 'वैनायक' व 'रेवती'चें अुपान्त्य अक्षर कांही ठिकाणीं ऱ्हस्व असेल, पण तें अंत्याक्षराशीं निगडित नाही. या अर्थानें 'अुपान्त्य' म्हणून तें ऱ्हस्वत्व दिसाअू म्हटलें. वरील जातींत तें अन्त्याशीं संयुक्त आहे, म्हणून तें खरें संबद्ध अुपान्त्य ऱ्हस्वाक्षर.

या अनुरोधाने विचार करतां 'अग्नि' (५ मात्रा) व 'हर' (७ मात्रा) या विषम मात्रांच्या व म्हणून स्वभावतःच खटक्यांनी भरलेल्या आवर्तनांत अशें ऱ्हस्वाक्षर मोठी खुबीची जागा पकडून असतें. त्यामुळे कांही ठिकाणीं ऱ्हस्वाच्या स्थानाचा विचार करावा लागेल. पण तेथेहि प्रस्ताराचा खेळ संभवतोच.

'अग्नि':—(१) गा गा ल | गा गा ल | गा गा ल | गा
(२) गा ल गा | गा ल गा | गा ल गा | गा
(३) ल गा गा | ल गा गा | ल गा गा | गा (यांत कर्णकटुता आहे?)
(४) ल ल ल ल ल | गा ल गा | ल ल ल गा | गा |
('अघम किती पालका असशि भू पा।')

यांतील पहिल्या प्रस्तारांत दिखाऊ उपान्त्य ऱ्हस्व आहे. पण त्याचा तादृश संबंध अन्त्य (+) दीर्घाशीं नाही हें दुसऱ्या व तिसऱ्या प्रस्तारावरून सिद्ध होतें. स्त्रीगीतांतील 'माझ्या ग लक्ष्मण हीरा' (गा गा ल। गा गा ल। गा ऽ गा) अशी रचना घेतल्यास उपान्त्याचें उपाक्षर ऱ्हस्व येतें. तेंहि नियतच मानावयाचें काय?

'हर':—(१) गा गा गा ल | गा गा गा ल | गा गा गा ल | गा
(२) गा गा ल गा | गा गा ल गा | गा गा ल गा | गा
(३) गा ल गा गा | गा ल गा गा | गा ल गा गा | गा
(४) ल गा गा गा | ल गा गा गा | ल गा गा गा | गा

यांपैकी तीन मिळून (५) गा गा गा ल | गा गा ल गा | ल गा गा गा | गा व अशींच संयोजनें शक्य आहेत. यांमध्ये (१) हें 'दिखाऊ' उपान्त्य ऱ्हस्वाचें आहे. यावरून हें दिसून येईल की 'प्रस्तारभेदेन जातिविशेषः' अशा तऱ्हेचा नियम वस्तुस्थितीला धरून होणार नाही. हा सर्व विचार 'जाति' प्रकरणींच मात्र लागू आहे, अक्षरगणयुक्त 'वृत्त'विस्तारांत अक्षरांचीं विशिष्ट स्थळेंच नक्की असतात. परंतु 'जाति'विचारांत अशा विशिष्ट रचनेच्या जाति आहेत त्या विवाद्यच आहेत; व अशा ठिकाणीं 'चालीं'तील प्लुत मात्रा अवश्य विचारांत घेऊन निर्णय करावा. श्री. सहस्रबुद्धे यांचा असा प्रयत्न कांही पद्यप्रकारांत उपयुक्त होईल—की जिथे गेयता प्रधान असून गळ्यावर म्हणतांना जरूर तेवढ्या मात्रा भरून काढावयाच्या असतात. प्रस्तुत 'वैनायक' चर्चेत तसा कांहीच प्रकार नाही.

(ड) 'सावरकर-काव्य-समालोचनां'त प्रो. जोग यांनी जो दोष दाखविला आहे त्यामागे फक्त कर्णकटुता किंवा गानौघभंग एवढाच मुद्दा असावा. स्वतः ते त्याचें स्पष्टीकरण करतीलच. परंतु हा दोषहि एक तर गाणाऱ्याच्या व ऐकणाऱ्याच्या वैयक्तिक रुचीवर बहुधा अवलंबून असतो. शेवटच्या विरामाचा दोष ग्राह्य आहेच. परंतु उपान्त्य ऱ्हस्वाबद्दल दीर्घ येणें हा मानलाच तर रुचिभेद मानावा. रचनाकर्त्याच्या वैयक्तिक रुचीप्रमाणे तो रचना बदलील—बदलण्याला वाव आहे. टीकाकारांनी त्याला ही रचना कटु आहे असें सांगावें पाहिजे तर. पण त्यामुळे ती 'दुष्ट' रचना होणार नाही. शिवाय सावरकरांच्या पठनाच्या पद्धतींत जी 'मंजुल सुरेलता' अभिप्रेत आहे ती त्यांतील भृंगावर्तनी रचनेमुळे व यतींच्या सुंदर योजनेमुळे कशी आहे तें मीं वर निर्देशिलेल्या लेखांत विस्ताराने दाखविलें आहे. ती शक्य आहे एवढाच त्यांचा भावार्थ. तो त्याचा एक विशेष केल्या

तरी वापरण्यासारखा आहे. खरें म्हणजे सावरकरी रचना 'निर्यमक पद्या'ला अनुकूल अशी पठन-वाचन-सुलभ आहे, असावयास पाहिजे. 'वाचना'चे वेळीं शेवटल्या ४ मात्रांच्या 'विरामा'ची अडचणहि रसभंगकारी होत नाही असा अनुभव आहे. परंतु विशेष हें की अगदी गायकीची चाल लावून म्हटलें तरी (विरामा'च्या प्लुत मात्रा घेतल्यावर) चाल अखंडितपणें वाहते व तिला 'अुपान्त्य दीर्घा'ची अडचण होत नाही. 'वीर मंदा'चें आख्यान कीर्तनांत अुत्तररंगाला सुरू करून त्यांत 'मूर्ति दुजी ती'– २ मधील सबंध वैनायकी रचना मृदंगाच्या तालांत अहमदाबाद येथील अेका प्राध्यापकांनी म्हटली असतां तींत अुपान्त्य-ऱ्हस्वाप्रमाणेच अुपान्त्य-दीर्घ चरणहि आले. पण केवळ त्यामुळे कानाला कटुता मासली नाही. तालासाठी (तबल्याच्या किंवा मृदंगाच्या ठेक्यांत खंड पडूं नये म्हणून) विरामाच्या मात्रा अन्त्य ( + ) दीर्घ लांब ओढून भरून काढाव्या लागत अेवढें खरें. पण सावरकरी रचनेंत हें असें साग्रसंगीत गायन अभिप्रेतच नाही. तेथे वक्तृत्वपूर्ण आरोहावरोहांचें पठन अवश्य आहे. यावरूनहि 'महाराष्ट्र गीतां'तील अुपान्त्य ऱ्हस्वाची रचना भिन्नजातित्व देण्याअितकी स्वतंत्र नाही. ती 'सामान्य' वैनायक (किंवा धवलचंद्रिका) जातीचा अेक 'विशेष' प्रकार प्रस्तारामुळे झालेला आहे, हें सिद्ध झाल्यासारखें मला तरी वाटतें.

(अि) वास्तविक एक 'खटका' बदलल्याने सबंध चाल बदलली असें होत नाही. जुनीं पदें व 'महाराष्ट्रगीत' यांत असलेलें अुपांत्य ऱ्हस्वाक्षर बदललें गेल्यामुळे कांहीतरी फरक झाला अेवढें खरें. परंतु 'चाल' म्हणजे तरी काय हा वाद न अुकरतां क्षणभर गृहीत धरलें की चाल बदलली, तरी तेवढ्याने 'जाति' बदलली असें कसें होअील ? सारख्याच मात्रावलीच्या चरणांना विविध चाली लावतां येतात व त्या मात्रांची ओढाताण न करतांनाहि म्हणतां येतात हें वास्तविक सर्वसामान्य ज्ञान आहे. कै. तांब्यांच्या अेका 'प्रणयप्रमा' 'जाती'चेंच अुदाहरण घेतलें तरी आपणांस हें कळून येअील. स्वररचनेंतील साम्य असलेल्या निरनिराळ्या रागांत ती गातां येते. खरोखर 'गेयता' किंवा 'चाल' किंवा 'गळ्यावर म्हणणें' याचा पद्यरचनेच्या दृष्टीने अभिप्रेत अर्थ त्यांतील रागदारी नव्हे, तर त्यांतील मात्रात्मक ताल. गायन-सुलभ पद्यांत किंवा 'गीतांत' 'बोलां'तील खटक्यांच्या फेरफाराने तबलजी मजा आणतो व त्या तालात्मक खटक्यांना योग्य असे स्वरबंध गायक आरोहावरोहाने पालटीत असतो. यांत अपूर्व रंग असतो, पण हे सर्व खटक्यांचे 'बोल' किंवा आरोहावरोह त्याच तालाचे किंवा रागाचे प्रस्तार असतात. त्यामुळे ताल फिरत नाही की राग बदलत नाही. या दृष्टीने पाहतां कानाला हा अुपान्त्य ऱ्हस्वाने अुत्पन्न होणारा खटका अधिक गोड वाटतो असें म्हणतां येअील. पण तो बदलून वाजवितां किंवा गातां येणारच नाही असें नाही, व आल्यास ताल किंवा राग फिरला असेंहि होत नाही.

शेवटीं अेवढेंच म्हणावयाचें आहे की आक्षेपक मित्रांस वाटतें तितकें विशेष चिकित्सेचें व पृथक्करणाचें वावडें कुणालाहि नाही. 'सूक्ष्म' विचारहि स्वागतार्हच आहे. पण तें पृथक्करण किंवा सूक्ष्म विच्छेदन खरोखर यथायोग्य असावें. प्रथम 'छंदोरचना'कार्याची पद्धति सूक्ष्मतया आत्मसात् करावी. नाही तर प्रस्तुत प्रकरणीं घडल्याप्रमाणे दिखाअू परस्परविरोधावर शस्त्र अुगारावें व तें पोकळ जागीं दाणकन् आपटावें असा 'विनोदी' प्रकार होतो. मात्र अशा चर्चेने आक्षेपकांचें म्हणणें जरी नेहमीच ग्राह्य ठरलें नाही, तरी रचनेसंबंधींचें तारतम्य कळावयास ती अुपयोगी पडते. पूर्वग्रहरहित चर्चेने निदान अेवढा फायदा झाला तरीहि बरेंच झालें. तसें होण्यास साहाय्यभूत होण्याअितकें महत्त्व प्रस्तुत दोषचर्चेत आहे अेवढें प्रांजलपणें म्हणावेंसें वाटतें.

---

# परीक्षणें

## वेदान्तः—

**अद्वैत-सिद्धान्त-दर्शन** — ले० आचार्यभक्त द. वा. जोग, उपनिषत्तीर्थ; प्रका० ग. वि. केतकर; मूल्य १० रुपये.

अद्यापिहि आपल्या देशांत वेदान्त, न्याय, मीमांसा, अलंकार इत्यादि शास्त्रांचा अभ्यास इंग्लिश-च्या द्वारें होत आहे. इंग्लिशमधून अभ्यास करण्याच्या या पद्धतीमुळे एक मोठीच आपत्ति निर्माण होते. ती ही की, मुळांत अत्यंत अवघड असलेल्या विषयाचें आकलन प्रयासानें झाल्यानंतरहि तें इंग्लिश-मधून प्रकट करणें आवश्यक असल्यामुळे विद्यार्थ्यांना दुहेरी श्रम घ्यावे लागतात. कित्येक वेळां असेंहि होतें की, षड्दर्शनांत आलेल्या अनेक विषयांचें स्पष्टीकरण कॉलेजमध्ये इंग्लिशमधूनच होत असल्यानें सामान्य विद्यार्थ्यांच्या दृष्टीनें आकलनाची पहिली पायरीच ओलांडणेंहि दुर्घट होऊन बसतें. आकलनाच्या अभावीं त्याचें विवेचन इंग्लिशमधून करणें हें तर सुतराम् अशक्य होतें. इंग्लिशसारख्या परभाषेंतून षड्दर्शनांतील विवेचन करण्याच्या या पद्धतीमुळे बहुसंख्य विद्यार्थ्यांना जे अनिवार कष्ट सोसावे लागतात ते बरेचसे कमी करण्याचा एकच मार्ग आहे; आणि तो म्हणजे वेदान्त-अलंकारादि शास्त्रांचें अध्ययन आणि अध्यापन या गोष्टी मातृभाषेंतूनच करणें. ज्ञानाचें शिखर गांठण्यासाठी हा सर्वांत जवळचा आणि सोपा रस्ता आहे. यायोगें अध्यापक आणि अध्येता या दोघांचेहि श्रम वांचतील व आवश्यक असल्यामुळे केवळ परीक्षेच्या निमित्तानेच जे विषय वाचले जातात त्यांच्याकडे निराळ्या भावनेनें पाहावें असें विद्यार्थ्यांना वाटूं लागेल.

परंतु तत्त्व या दृष्टीनें हें सर्वांना मान्य होण्यासारखें असलें तरी प्रत्यक्षांत मात्र आजहि वेदान्त मीमांसेसारखे विषय इंग्रज़ी भाषांतरांच्या व टिप्पणींच्याच साहाय्यानें वाचणें विद्यार्थ्यांना भाग पडत आहे. कित्येक वेळां हीं भाषांतरेंहि पराकाष्ठेचीं दुर्बोध असतात असा अनुभव आहे. यामुळे मूळ विषयाचें आकलन हें एक काम व इंग्रजी भाषांतराचें आकलन होणें हें दुसरें काम, आणि मूळ संहिता व भाषांतर यांचा समन्वय हें तिसरें काम. असा तिहेरी कांच सध्या चालू आहे.

यावर कोणी असें म्हणतील की, युनिव्हर्सिटींत जोंपर्यंत हें मान्य होत नाही, तोंपर्यंत आहे हा प्रकार असाच चालू राहणार. दुसरे कोणी असें म्हणतील की, उपर्युक्त विषयांचें अध्ययन-अध्यापन मराठींत व्हावें हें खरें असलें तरी अशीं उपयुक्त पुस्तकें जोंपर्यंत उपलब्ध होत नाहींत, तोंपर्यंत नुसत्या तत्त्वाचा अभिनिवेश धरण्यांत काय मतलब आहे ? हे दोनहि वादी जें बोलतात त्यांत तथ्य नाहीं असें नाही. पहिला आक्षेप महाराष्ट्र ( किंवा पुणें ) युनिव्हर्सिटी प्रस्थापित झाल्यावर सुलभतेनें नष्ट होण्या-सारखा आहे. आणि पहिला आक्षेप नष्ट झाल्याबरोबर, म्हणजे अध्ययन-अध्यापन मातृभाषेंतून व्हावें हें मत संपूर्णपणें मान्य होऊन तें व्यवहारांत उतरल्याबरोबर दुसराहि आक्षेप तात्काळ नाहीसा होईल व कोणत्याहि शास्त्राचें मराठींतून विवेचन करणारे ग्रंथ निर्माण होऊं लागतील.

मराठींतून वेदान्तादि दर्शनांचें अध्ययन-अध्यापन व्हावें हें मान्य करूनहि उपयुक्त मराठी ग्रंथांची उणीव हें कारण याच्या आड येतें असें म्हणणाऱ्यांना उपनिषत्तीर्थ द. वा. जोग यांनी परि-श्रमानें लिहिलेल्या अद्वैत-सिद्धान्त-दर्शन या ग्रंथानें चोख उत्तर दिलें आहे असें म्हणण्यास कांहींच प्रत्यवाय नाहीं. ' काय करावें, चांगलें मराठी पुस्तकच नाहीं; नाहीं तर आम्ही हा विषय मराठींतून शिकवला असता ' अशी तक्रार करावयास जागा राहूं नये इतकी या ग्रंथानें मोठी कामगिरी बजाविली आहे. विद्यार्थ्यांना तर हा ग्रंथ म्हणजे मोठाच आधार वाटेल, पण शांकर-वेदान्ताविषयी जे कुतूहला-

न्वित आहेत, पण मूळ संहिता वाचणें संस्कृत भाषेच्या परिपूर्ण ज्ञानाच्या अभावीं ज्यांना शक्य नाही, अशा चिकित्सक प्रौढ वाचकांनाहि हा ग्रंथ निःसंशय मोलाचा वाटेल.

सुमारें ८० पृष्ठांची दीर्घ प्रस्तावना या ग्रंथाला जोडलेली आहे. वेदान्तशास्त्रांतील अनेक महत्त्वाच्या विषयांचें मर्मग्राही विवेचन या प्रस्तावनेंत शक्य तेवढ्या सुबोधपणें केलेलें आहे. ‘ शक्य तेवढ्या सुबोधपणें ’ असें म्हणण्याचें कारण असें की, मूळ विषय जिज्ञासु अभ्यासक जे कोणी असतील त्यांच्यासाठीच केवळ असल्यामुळे पारिभाषिक शब्दांच्या बाबतींत संस्कृतवरच साक्षात् अवलंबून असलेल्या मराठीसारख्या अशक्त भाषेच्या द्वारें त्याचें विवेचन करावयाचें म्हणजे कांहींसा क्लिष्टपणा अपरिहार्य आहे. भाषेचें लालित्य अन्यत्र सहजसाध्य असलें तरी याठिकाणीं मात्र तें अत्यंत कष्टसाध्य आहे हें विसरतां यावयाचें नाही. या दृष्टीने प्रस्तुत ग्रंथकारांनी मोठीच कर्तबगारी दाखविली आहे. यापेक्षाहि अधिक सुश्लिष्ट भाषेंतून हा विषय मांडतां येणारच नाही असें मला म्हणावयाचें नाही. पण या विषयावर जीं मराठी पुस्तकें मीं वाचलीं आहेत त्यांच्याशीं तुलना करतांना या ग्रंथाची कामगिरी मान्य करावयास पाहिजे. प्रो. शिवरामपंत परांजपे यांचा पूर्व-मीमांसेवरील ‘ अर्थसंग्रह ’ हा ग्रंथ व म. म. वासुदेवशास्त्री अभ्यंकर यांनी केलेलें शांकरभाष्याच्या दुसऱ्या अध्यायांतील पहिल्या दोन पादांचें मराठी भाषांतर हीं दोन अप्रतिम उदाहरणें आहेत, यांत शंका नाही. हीं उदाहरणें आदर्शभूत आहेत. त्यांच्याइतकें नसलें, तरी बरेंचसें यश श्री. जोगशास्त्री यांनी या ग्रंथांत मिळविलें आहे. विशेषतः स्वतः जोगांचेच मातुल आचार्यभक्त विष्णुशास्त्री बापट यांनी दशोपनिषद्भाष्याचें आणि विशेषतः ब्रह्मसूत्राचें जें पराकाष्ठेचें दुर्बोध आणि क्लिष्ट भाषांतर केलें आहे, त्या मानानें प्रस्तुत पुस्तक विवेचनाच्या सुबोधतेच्या बाबतींत किती तरी श्रेष्ठ आहे

प्रस्तावनेंत आरंभीं बादरायण व व्यास या भिन्न व्यक्ति आहेत या मताच्या पुष्ट्यर्थ अनेक पुरावे दिले आहेत व इतरांनी या बाबतींत केलेल्या विवेचनाचें तात्पर्य दिलें आहे. नंतर श्रीशंकराचार्यांच्या कालनिर्णयासंबंधी विवेचन केलें आहे. गौडपादाचार्यांच्या कारिकांमध्ये अनेक ठिकाणीं बौद्धांच्या तत्त्वज्ञानांतील पारिभाषिक शब्द आल्यामुळे ते बौद्ध असावेत हें दासगुप्तादिकांनी प्रचलित केलेलें मत निराधार असून ते पूर्ण वैदिकच होते हें मत जोगांनी आग्रहाने मांडलें आहे. या बाबतींतील त्यांचें विवेचन ग्राह्य मानावेसें वाटतें. यानंतर उपनिषद् शब्दाचा अर्थ, प्रमाणांचा विचार, लक्षणविचार, ब्रह्माचें तटस्थ-लक्षण व स्वरूप-लक्षण, विवर्तवाद, परिणामवाद, कार्यकारणभाव, इत्यादि विषयांचें विवेचन करून नंतर जग हें मिथ्या आहे या आचार्यप्रणीत सिद्धान्तांतील मिथ्या या शब्दाच्या अर्थाच्या बाबतींत केले जाणारे अनेक विपर्यास मांडून त्यांचें निराकरण जोगांनी केलें आहे. या विवेचनाच्या ओघांत ‘ परमार्थावस्थायां सर्वव्यवहाराभावं वदन्ति वेदान्ताः सर्वे ’ इत्यादि वाक्यें उद्धृत करून ‘ परमार्थावस्थेंतील व्यवहार खरा नव्हे असें मात्र आचार्य म्हणतात’ असें स्पष्टीकरण जोगांनीं दिलें आहे (पृ. ६४). सर्व लौकिक आणि वैदिक व्यवहार ब्रह्मात्मतेच्या प्रबोधापूर्वीच उपपन्न असून परमार्थावस्थेंत त्यांचा अभाव असतो असें म्हटल्यानंतर तो व्यवहार खरा नव्हे असें म्हणण्यांत काय सौरस्य आहे ! अभावच ज्याठिकाणीं आहे तेथे खरा अथवा खोटा हा प्रश्नच निर्माण होत नाही. येथील विवेचन अधिक स्पष्ट हवें होतें. विवेचनाचा हा अस्पष्टपणा अध्यास-प्रकरणांत पुनः एकदा झाला आहे. (उपोद्घात पृ. १३ ). ‘ अवभास ’ या संज्ञेची ‘ अवसन्नः अवमतो वा भासः अध्यासः । प्रत्ययान्तरबाधश्चास्य अवसादोऽवमानो वा ! एतावता मिथ्याज्ञानमित्युक्तं भवति ’ हें भामतीचें स्पष्टीकरण देऊन विवेचनाच्या ओघांत ‘ अवभास ’ हा शब्द खऱ्या अवभासालाहि लावतात ’ असें म्हणून ‘ नीलस्य अवभासः पीतस्य अवभासः ’ असें उदाहरण दिलें आहे. याहि ठिकाणीं अवभास या शब्दाची व्याख्या व त्या व्याख्येशीं सर्वस्वी विसंगत ‘ खरा अवभास ’ ही शब्दयोजना, यांतील विरोध नष्ट करण्यासाठीं अधिक विवेचन आवश्यक होतें. हें विवेचन विद्यार्थ्यांच्या मनांत निःसंशय संभ्रम उत्पन्न करील असें वाटतें.

सर्वच ‘अध्यास’ प्रकरण उत्कृष्ट उतरलें आहे. अनिर्वचनीय ख्याति, अन्यथाख्याति, आत्मख्याति, अख्याति आणि असत्ख्याति या विविध दर्शनांतील विविध ख्यातींचें विशदीकरण यथायोग्य झालें आहे.

अद्वैत-वेदान्त्यांना मान्य असलेली अनिर्वचनीय ख्याति सिद्ध करितांना इतर ख्यातींचें खंडन कौशल्यानें केलें आहे. हें सर्वच विवेचन पराकाष्ठेचें शास्त्रीय आणि सुबोध झालें आहे. या विवेचनांत विषयाच्या अनुरोधानें परिच्छेद योग्य ठिकाणीं पाडून प्रत्येक परिच्छेदाला शीर्षक दिल्यामुळें अभ्यासकाची मोठीच सोय झाली आहे. या विषयावरील जोगांचें विवेचन आदर्शभूत मानण्याइतकें सरस उतरलें आहे. अवच्छेद-वाद, एकजीव-वाद, नानाजीव-वाद व प्रतिबिम्ब-वाद इत्यादि वादांचें विवेचनहि उपयुक्त झालें आहे. हें १४८ पृष्ठांचें अध्यासप्रकरण म्हणजे एक स्वतंत्र ग्रंथच होय.

अध्यासप्रकरणांतील विवेचनाच्या वेळीं जी शास्त्रीय दृष्टि जोगांनीं सर्वत्र ठेविली आहे तीच संहितेच्या मराठी विवेचनांतहि ठेविली आहे. पूर्वपक्षाचें म्हणणें तावडतोब कळून यावें यासाठीं त्यांनीं विषयाच्या दृष्टीनें लहानलहान परिच्छेद पाडले आहेत व प्रत्येक परिच्छेदाला विषयानुरोधानें समर्पक शीर्षक दिलें आहे. त्यामुळें पूर्वपक्ष कोठें संपला व सिद्धान्त कोठें सुरू झाला याविषयीं विद्यार्थ्याला चुकून सुद्धा शंका येणार नाहीं. अभ्यासाला ही पद्धति फारच उपयुक्त ठरेल असें वाटतें. सर्वच टीपा अर्थबोधाच्या दृष्टीनें उपयुक्त झालेल्या आहेत. भाष्याचा विस्तृत सारांशहि दिला आहे.

परिशिष्टांत रामानुज, वल्लभ, मध्व इत्यादि सांप्रदायिक आचार्यांनीं सूत्रार्थ कोणत्या प्रकारें लावून दाखविला आहे याचें तौलनिक विवेचन केलें आहे. आणखी एका परिशिष्टांत स्वत:प्रामाण्यवाद व परतः-प्रामाण्यवाद यांची चर्चा आली आहे. शेवटीं जवळ जवळ हजार पारिभाषिक संज्ञांचा कोश दिला आहे. अभ्यासकांना तो फार मोलाचा वाटेल.

एवंच, निर्मळ शास्त्रीय दृष्टि, पूर्वग्रहांचा अभाव, चिकित्सक बुद्धि, तौलनिक अभ्यासाची तयारी, प्रतिपक्षीयांच्या विवेचनांतील मर्म शोधून काढण्याची शक्ति, व सिद्धान्त प्रस्थापित करण्यास समर्थ असलेली बुद्धि या गोष्टींमुळें जोगशास्त्र्यांचा प्रस्तुत ग्रंथ विद्यार्थ्यांना व चिकित्सक वाचकांना उपयुक्त झाला आहे.

एक गोष्ट मात्र उपेक्षणीय नाहीं. शास्त्रीय ग्रंथांत तरी मुद्रणदोष नकोत. या ग्रंथांत अनेक अक्षम्य मुद्रणदोष झालेले आहेत. वाई, गडबड वगैरे नित्याच्या सबबी असल्या तरी त्यांचें दूषणीयत्व कमी होणार नाहीं.

रा. शं. वाळिंबे

## कायदाः—

### ड्राफ्ट हिंदु कोड—अे स्टडी—- ले० के. बा. गजेंद्रगडकर.

श्रीयुत केशवाचार्य गजेन्द्रगडकर हे एक व्यासंगी गृहस्थ आहेत. हिंदु कायद्याचा त्यांचा अभ्यास सर्वांगपूर्ण, सूक्ष्म व मूलग्राही आहे. हिंदु कायद्यांतील निरनिराळ्या विषयांवर त्यांनी आजपर्यंत अनेक लेख लिहिले आहेत. तसेंच त्या विषयासंबंधानें मतें व्यक्त करण्याचा त्यांचा अधिकार निर्विवाद आहे. जुन्या परंपरेंत वाढलेल्या, मूळ धर्मशास्त्रग्रंथांचें परिशीलन असलेल्या व इंग्रजी कायद्याची पदवी घेतलेल्या ह्या धर्मकोविदानें रावकमिटीनें परिश्रमपूर्वक तयार केलेल्या हिंदु-कायद्याच्या मसुद्याचें समर्थन केलें आहे ही गोष्ट ह्या कोडावर आग पाखडणाऱ्यांच्या डोळ्यांत क्षणक्षणीत अंजन घालण्यास पुरेशी आहे. पण ते डोळे उघडतील तेव्हां ! ‘ अंधस्य दीपो बधिरस्य गीतं मूर्खस्य किं शास्त्रकथाप्रसंगः ! ’ हेंच खरें !

प्रथम एका अिंग्रजी त्रैमासिकांत प्रसिद्ध झालेला हा लेख आता स्वतंत्र छापून प्रसिद्ध केला आहे. ह्या लेखाला त्यांनीं अभ्यास ( ड्रॅफ्ट हिंदु कोड— ए स्टडी ) ह्या नेमस्त नांवानें उल्लेखिलें असलें तरी त्यांत प्रदर्शित केलेलीं मतें पुरतेपणीं विचार करून निश्चित झालेलीं आहेत ह्यांत संशय नाहीं.

लेखकानें रावकमिटीच्या मसुद्याचा सारांश देऊन नवीन कलमें कशीं सयुक्तिक आहेत तें कारणें देऊन सिद्ध केलें आहे. त्यानंतर मसुद्यावर घेतलेल्या आक्षेपांचें खंडन केलें आहे तें वाचण्या-सारखें आहे.

" हिंदु " शब्दाची व्याख्या करणें हें गौरीशंकर शिखर चढून जाण्याइतकें दुर्घट आहे, म्हणून हिंदूंत कोणते धर्मपंथी येतात हें सांगण्यापलीकडे कमिटीला कांहीं करतां आलें नाहीं. आमच्या मतें बौद्ध, शीख व जैन ह्यांच्याबरोबर अस्पृश्य, आदिवासी व लिंगायत ह्यांचाहि स्पष्ट शब्दांत निर्देश झाला असता तर बरें होतें. कमिटीला डॉ. आंबेडकरांची धास्ती वाटली असावी !

समायिक कुटुंबांतील एखादा पुरुष निपुत्रिक मरण पावला तर त्याचा समायिक मिळकतींतील हक्कहि त्याच्याबरोबर मरतो हा मिताक्षरा पद्धतींतील नियम रद्द करून कमिटीने दायभाग पद्धतीचा स्वीकार केला, ह्यामुळेहि कमिटीवर पुष्कळांचा रोष झाला आहे. ह्याला गजेन्द्रगडकरांचें उत्तर असें की, देशमुख कायद्याने निपुत्रिक विधवेला समायिक मिळकतींत हक्क देऊन मिताक्षरेला स. १९३७ सालींच मूठमाती दिली गेली आहे. ह्यानंतर समायिक मिळकतींत मुलाचा जन्मतःच असलेला हक्क काढून टाकण्यांत कमिटीने देशमुखांनी पाडलेल्या व लोकांनी मूकसंमति देऊन मान्य केलेल्या मार्गाचाच अवलंब केला आहे.

वस्तुतः पाहतां समायिक जिंदगीप्रमाणे समायिक पत्नी जेथे असते, तेथेच समायिक कुटुंबपद्धति पूर्णत्वाने व कणखरपणाने नांदत असलेली दिसून येते. तेव्हां, ह्या पद्धतीवर पहिला घाव भाऊ स्वतंत्रपणे लग्नें करूं लागले तेव्हां पडला. पुढे स्मृतिकारांनीच मुलाचें कल्याण करण्याच्या निमित्ताने बापाचे अथवा कर्त्याचे अधिकार संपुष्टांत आणून एकत्र-कुटुंबपद्धतीचें पेंकाटच मोडलें. बापलेकाच्या कुटुंबांत बाप प्रथम स्वामि-पदावर होता तेथून तो कालांतराने विश्वस्त-पदावर आला. वडिलार्जित मिळकतींत पुत्रांना जन्म-सिद्ध हक्क दिल्याने पित्याची अनियंत्रित सत्ता नष्ट झाली. एकत्र कुटुंबपद्धतीवर आरंभापासून आजपर्यंत कोठून व कसकसे हल्ले झाले ह्याचा उद्बोधक इतिहास कोणीं तरी स्वतंत्रपणे लिहिण्यासारखा आहे.

ज्याला पिंड देतां येईल तो वारस, ही पहिली धार्मिक कल्पनांवर उभारलेली दायभागपद्धति. परंतु पुढे नात्याचा संबंध, सोयरीक ह्यांवर वारसा-हक्क प्रस्थापित झाला. हा एवढा प्रचंड फरक आमच्या शास्त्र्यांना दिसतच नाहीं. कितीहि जगड्व्याळ फरक होवोत, आमच्या विमूढ शास्त्र्यांचें धर्मशास्त्र ध्रुवाप्रमाणे अढळ आहे ! आम्ही सामयाचारिक धर्म सांगतों, असें सूत्रकार स्वतः सांगत असतां त्यांच्यावर मुसलमानां-प्रमाणे शब्दप्रामाण्य लादण्याचा आग्रह आमचे पंडित धरीत असतात. स्मृतींना जर शब्दप्रामाण्य आहे तर त्यांनींच देशाचाराला महत्त्व कधीं तरी दिलें असतें का ? " आदौ तावद्देशधर्मान् विचिन्त्यो... यस्मिन् देशे य आचारः पारंपर्यक्रमागतः । वर्णानां किल सर्वेषां स सदाचार उच्यते " इत्यादि वचनें कशीं लावाव-याचीं हें कोणी पंडित सांगेल काय ? ह्या वचनांत समाजशास्त्राचें अत्यंत महत्त्वाचें तत्त्व संगृहीत करून ठेवलें आहे आणि ह्यांतच आमच्या धर्माची महती आहे. अशीं वचनें अन्य धर्मांच्या प्रमाणग्रंथांत केव्हांहि आढळणार नाहींत. काश्मीर संस्थानांतील लदाक प्रांतांत बहुपतित्वाची चाल आहे. सर्व भावांमिळून एकच बायको असते. ही चाल परिस्थितीमुळे पडली. बर्फमय प्रदेश, लागवडीची जमीन थोडी; बाहेरच्या प्रदेशाशीं दळणवळण नाहीं. अशा परिस्थितींत नेमकी लोकसंख्याच जगूं शकेल. अनेक पुरुषां-मध्ये एक स्त्री असल्याने संततिनियमन होतें. ह्या रूढीमुळे तेथील लोक सुखाने जगतात अशी सर्वांची समजूत आहे. परिस्थिति बदलल्यावाचून ही रूढि बंद केली तर तो अधर्म होईल; कारण त्या योगाने लोकनाश होणार आहे. अशीं वचनें शब्दप्रामाण्य-वादाचें नरडेंच दाबतात. पाठांतऱ्या शास्त्र्यांच्या ह्या शब्दप्रामाण्यांतहि हिंदूंच्या अवनतीचें खरें कारण सांपडण्याजोगें आहे. हिंदुस्थानांतील लाखो बाटगे मुसलमान व खिस्ती हीं आमच्या शास्त्री-पंडितांच्या मूर्खपणाचीं जिवंत स्मारकें होत. अद्यापि त्यांचे डोळे उघडले नाहींत. परिषदा भरवून हे विद्वान् ( ! ) आपल्या अज्ञानाची मशाल पाजळण्याचें धाष्ट्य अजून करीत आहेत. ह्यांतच त्यांचें गाढ अज्ञान प्रकट होतें. स्मृति-ग्रंथांतील वाक्यें व धर्मशास्त्राचीं तत्त्वें ह्यांतील भेद आमच्या शास्त्र्यांना समजतच नाहीं. ह्या दृष्टीने केशवाचार्यांनी कोडाची केलेली शिफारस ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ते स्पष्ट बजावतात की, धर्मशास्त्राच्या मूलभूत तत्त्वांचें उल्लंघन कोडकारांनी कोठेंहि केलें नाहीं. ह्या कायद्याने राष्ट्रीयत्वाची भावना वाढेल असा त्यांना विश्वास वाटतो. पण शास्त्री आणि राष्ट्राभिमान ह्यांची संगति कधीं प्रत्ययास आली आहे काय ? राष्ट्र बुडालें तरी त्याची त्यांना परवा नाहीं. हिंदुधर्म राष्ट्रीय भावनेला पोषक आहे; किंबहुना राष्ट्रीयत्वावरच त्या धर्माची

उभारणी झाली आहे. धर्म राष्ट्रोत्कर्षक, तर धर्मज्ञ म्हणवून घेणारे राष्ट्रबुडवे, असा अपूर्व कुयोग झाला आहे.

स्त्रियांना मिळकतीवर पूर्ण मालकी-हक्क देण्याविरुद्ध पुष्कळ लोक आहेत. स्त्री कुटुंब स्थापीत नाही, कुटुंबाचा संस्थापक पुरुष असतो, ह्यास्तव पुरुषाकडे मिळकत राहणें इष्ट आहे, असा एक मुद्दा ह्या बाबतींत विचार करण्यासारखा पुढे मांडण्यांत येतो. परंतु स्त्रीला पूर्ण मालकी-हक्क देऊनहि इष्ट हेतु साधतां येणार नाही असें नाही. योग्य दुरुस्ती सुचविणें निराळें आणि साप साप म्हणून काठ्यांनी बडविणें निराळें. आमच्या पूर्वापार समजुतीप्रमाणे स्त्री ही पुरुषाची अर्धांगी मानण्यांत येते. अर्थात् पति व पत्नी ह्या दोघांची मिळून अेक काल्पनिक व्यक्ति बनते. ह्या व्यक्तीलाच दांपत्य किंवा युग्म म्हणतात. दोहोंपैकी अेकाच्या मृत्यूने दांपत्याची विघटना होते असें मानण्याचें कारण नाही. पुनर्विवाहानेच दांपत्याचा भंग होअील. ह्यास्तव पतिनिधनानंतर स्त्री ही त्याच्याच ठिकाणीं आहे असें समजून मिळकतींतील पतीचे सर्व अधिकार स्त्रीला प्राप्त व्हावे. म्हणजे आअी जिवंत आहे तोंपर्यंत मुलांना वडिलांच्या मिळकतींत कोणताहि हक्क प्राप्त होअूं नये. पतीच्या हयातींत पतिपत्नींच्या सहीवांचून म्हणजे अेकट्या पतीच्या सहीने स्थावर-जंगम मिळकतीची तबदील करण्यास प्रतिबंध असावा. सपुत्रा विधवेसंबंधाने अशा स्वरूपाची व्यवस्था करणें शक्य आहे.

निपुत्रिक विधवेचा प्रश्न थोडा भानगडीचा आहे. तथापि धर्मनिर्णयमंडळाने सुचविलेली तडजोड मान्य झाल्यास नव्या-जुन्या दोनहि पक्षांचें समाधान होण्यासारखें आहे. मयताचे अगदी जवळचे वारस असतील, अुदा० भाअू, पुतणे वगैरे, तर विधवेला मर्यादित हक्क असावे. जवळच्या वारसांच्या अभावीं विधवेला तिच्या नवऱ्याच्या मिळकतीवर पूर्ण स्वामित्व देण्यास हरकत नसावी. अशा रीतीने लांबच्या वारसांचे हक्क नष्ट होणार आहेत; पण त्याबद्दल कोणीं तकरार करण्याचें कारण नाही. रिव्हर्शनरी अिंटरेस्ट हें हायकोर्टाचें पिल्लूं आहे. त्याला स्मृतिग्रंथांत फारसा आधार मिळण्यासारखा नाही. स्त्रिया मिळकत उधळतील हा पोरवाद विचारांत घेण्यासारखाहि नाही. पुरुष तर ह्या बाबतींत स्त्रियांनाहि मागे टाकतील. ह्याला खरा उपाय म्हणजे खासगत संपत्ति हळू हळू कमी करून राष्ट्रसंपत्ति वाढविणें हा होय. ही गोष्ट आज ना उद्यां झाल्याविना राहणार नाही.

आमच्या धर्मांत सरकारने ढवळाढवळ करूं नये असा साभिमान आक्षेप घेतला जातो, त्याला लेखकाने चोख उत्तर दिलें आहे. ह्या आक्षेपांत वृथाभिमान आहे. समंजसपणाचा अंशहि नाही. हिंदूंची आज कोणती संस्था आहे की ती हें सरकारचें काम करूं शकेल ? बरें, संस्था अस्तित्वांत आणून तिने काही नियम केले तर त्यांची अंमलबजावणी कोण करणार ? परमेश्वराच्या खालोखाल सरकार हें विश्वरूपी आहे. दिसण्यांत निरुपद्रवी असा नियम केल्याने सुद्धां धर्माचरण बंद पाडतां येतें हें ह्या आक्षेपकांस कसें कळत नाही ? मुसलमान आणि इंग्रज ह्यांत फरक आहे तो हाच. हिंदूंच्या धर्माचा उच्छेद करण्याकरतां मुसलमानांनी जुलूम केला. परंतु इंग्रजांच्या राजवटींत इंग्रजांनी हिंदूंना बिनबोभाट हिंदुत्व गमावण्यास लाविलें आहे. आडमुठ्या मुसलमानांत इंग्रजांची ही करामत नाही. आजचे भौतिक शोध व त्यांमुळे निर्माण झालेली परिस्थिति प्राचीन अथवा परंपरागत धर्माचारांचा लोप करण्यास कारणीभूत झाली आहे हें खरें असलें, तरी तेवढ्याने इंग्रजांच्या धूर्तपणाला बाध येत नाही.

दुसरा एक हास्यास्पद आक्षेप असा आहे की, आमच्या अनादि कालापासून चालत आलेल्या रूढि नष्ट करणारा प्रस्तुत कायदा आहे. ह्या आक्षेपाचें गजेन्द्रगडकरांनी केलेलें निरसन बिनतोड आहे. रूढि ह्या वर्तमान परिस्थितीला अनुरूप असतात तेव्हाच त्या धर्म म्हणून पाळल्या जातात. परंतु भौगोलिक अथवा वैचारिक परिस्थिति बदलली म्हणजे त्याच रूढि समाजाला अपकारक होतात, हा रूढिशास्त्राचा नियम आहे. सती जाण्याच्या चालीचा पुनरुद्धार करावा; पांडवी विवाह या युगांत रूढ करावे; शाक्त धर्माला प्रोत्साहन द्यावें; मनुष्याचें बलिदान सुरू करावें; गोमांसभक्षण व सुरापान ह्यांस कोणीं प्रत्यवाय करूं नये असें का सनातन्यांचें म्हणणें आहे ? बरें, एक वेळ बंद असलेली नियोगाची चाल

पूर्वीच्या ऋर्षीनीच बंद पाडली ना ? सनातन्यांचें अज्ञान सनातन आहे, ते त्याची जोपासना काळजीपूर्वक करीत आहेत हें मात्र खरें. असो, सनातन्यांनी आजपर्यंत हिंदु समाजाचें अपरिमित नुकसान केलें, त्यांच्या जोडीला हायकोर्टातील न्यायाधीश आले: हिंदुधर्म हा ख्रिस्ती धर्माप्रमाणेच आहे असें इंग्लिश न्यायाधीश गृहीत धरून चालले. स्मृति त्यांनी बंधनकारक मानल्या. आता स्मृति अनेक, तेव्हा समन्वय करण्याची टूम निघाली. अशा रीतीने दोघांनी समाजाची प्रगति थोपवून धरली. धर्मशास्त्र काय आहे तें समजून घेणें हेंच आपलें काम अशी हिंदु धरून सर्व न्यायाधीशांची समजूत. ही समजूत निखालस चुकीची आहे. धर्मशास्त्र काय आहे हें अवश्य समजून घ्यावें; परंतु शास्त्र काय असावें हें सांगण्याचा अधिकारसुद्धा न्यायाधीशाकडे आजच्या समाजस्थितींत गेला आहे. 'आर्यस्य यत् मनसे रोचते स धर्मः' ह्या वचनाच्या आधारावर धर्म सांगण्याचा अधिकार न्यायाधीशाने आपल्याकडे घ्यावा. धर्मशास्त्राविषयी अज्ञान असलेल्या हिंदु न्यायाधिशांच्याकडून अशी अपेक्षा करणें आजपर्यंत निष्फळ होतें. त्याला हिंदुधर्मांचीं मूलतत्त्वें जाणणारा न्यायाधीश पाहिजे. तो आर्य असला पाहिजे. पूर्वपरंपरेंत वाढलेला मनुष्यच आर्य असतो. हायकोर्टाच्या बाहेर धर्म काय असावा हें सांगणारी धर्म-निर्णय-मंडळ ही एकच संस्था आहे. तिचें वाङ्मय हायकोर्टातील न्यायाधिशांनी अभ्यासल्याशिवाय गत्यंतर नाही.

अखेरीस, श्री. केशवाचार्य गजेन्द्रगडकर यांनी हिंदु-कोडाच्या समर्थनपर सुंदर लेख लिहून जी समाजसेवा केली त्याबद्दल त्यांचें अभिनंदन करून हें परीक्षण पुरें करतों. ना. गो. चापेकर

## शिक्षणः—

(१) जीवनशिक्षणः— सं० आचार्य भागवत; प्रका० देशमुख; मूल्य ४। रुपये.

(२) पालकांसाठी 'बालविकास व शिस्त':— ले० ताराबाई मोडक; पद्म प्रकाशन लिमिटेड, मुंबई; मूल्य रु. १॥.

(३) पालकांसाठी 'बिचारी बालकें':— ले० ताराबाई मोडक; पद्म प्रकाशन लिमिटेड, मुंबई; मूल्य रु. १।.

कोणत्याहि समाजाचें अगर राष्ट्राचें श्रेष्ठत्व त्या त्या काळीं प्रचलित असलेल्या तत्त्वज्ञानावरून मुख्यत: ठरवितां येतें. हें तत्त्वज्ञान आचरणांत कोणत्या तऱ्हेने आणावें याचें तंत्र राष्ट्रांतील शिक्षण-पद्धतींत सामावलेलें असतें. पशुत्व, मनुष्यत्व, देवत्व ह्या विकासाच्या पायऱ्या. शिक्षणानें या विकासाला साहाय्य करावयाचें; परंतु एखादा विजयी समाज जित समाजाचा हा विकास होण्यास अवकाश देईलच असें म्हणतां येत नाही. ह्याचें उत्तम निदर्शन म्हणजे हिंदुस्थान. पाश्चात्य जेत्यांनी हिंदुस्थानला देवत्वा-प्रत नेणारें शिक्षण दिलें नाहीच, उलट मनुष्यत्वाचाहि विसर पडण्याचा अधिक संभव प्रचलित शिक्षण-पद्धतींत दिसून येतो.

शिक्षणाला मंदिराची उपमा देण्यापेक्षा परोपकारासाठीं सर्वस्व वेंचणाऱ्या वृक्षाचीच उपमा देणें उचित आहे. त्या वृक्षाच्या मुळाशीं प्राथमिक शिक्षणशाखा, मध्यम शिक्षण व विकसित फुलें अगर परिपक्व फळें म्हणजे उच्च शिक्षण असें म्हणतां येईल. परंतु आपल्या देशांत प्राथमिक शिक्षणाकडे इतकें अक्षम्य दुर्लक्ष झालें आहे की या शिक्षणवृक्षाचीं मुळेंच वाळून गेलीं आहेत, आणि त्यामुळेच दुय्यम व उच्च शिक्षणापासून होणारे लाभ तर पदरांत पडत नाहीतच; उलट सर्वच्या सर्व शिक्षणवृक्ष वठल्यासारखा दिसूं लागला आहे.

ही गोष्ट राष्ट्रीय नेत्यांच्या ध्यानांत आली नाही असें नाही, आणि त्यावर उपाय सुचविले गेले नाहीत असेंहि नाही.. परंतु राजसत्तेचें पाठबळ मिळाल्याविना शिक्षणसुधारणा अशक्य होऊन बसली आहे. सन १९३९ सालीं राष्ट्रीय सरकार अस्तित्वांत आल्यावर प्राथमिक शिक्षणाचा प्रश्न प्रामुख्याने समाजापुढे उभा राहिला व त्याचेंच दृश्य फल म्हणजे "वर्धा शिक्षणयोजना" हें होय. महात्मा गांधींच्या

मार्गदर्शनाखाली ही जीवन-शिक्षणाची योजना आचरणांत आणण्याचा प्रयत्न झाला, परंतु बुद्धीच्या अतिशयामुळे म्हणा अगर अन्य कांही कारणासाठी म्हणा, महाराष्ट्रानें ह्या योजनेला द्यावा तितका पाठिंबा दिला नाही हें खरें.

वर्धा शिक्षण-योजनेसंबधी त्या वेळीं वाङ्मयहि फारसें उपलब्ध नव्हतें. आता यासंबंधी बरीच सोय झाली असून आचार्य भागवत यांनी संपादिलेल्या "जीवन-शिक्षण" या ग्रंथांत निरनिराळ्या शिक्षणतज्ज्ञांचीं मतें वाचकांस वाचावयास मिळतील. महात्माजी म्हणतात त्याप्रमाणे सांप्रत लोक "बुद्धीचा उपयोग करीतच नाहीत; करावा लागत नाही. हृदयाचें शिक्षण नसल्यासारखेंच असतें; यामुळे कशास कांही मेळ नाही. असलें जीवन त्यांचें चाललें आहे........मनुष्य म्हणजे केवळ बुद्धि नव्हे, केवळ शरीर नव्हे, केवळ हृदय किंवा आत्मा नव्हे. तिघांच्याहि एकसारख्या विकासांत मनुष्याचें मनुष्यत्व सिद्ध होतें." महात्माजींनी सांगितलेलें व शिक्षणाच्या मुळाशीं असलेलें हें तत्त्वज्ञान कोणीच अमान्य करणार नाही म्हणूनच हें तत्त्वज्ञान आचरणांत आणण्यासाठी समाजाला द्यावयाचें शिक्षण हें जीवनद्वारा द्यावयाचें असलें पाहिजे, व त्यामुळे अंतिम ध्येय— सर्व मानवी शक्तींचा विकास— सुलभतेने साध्य झालें पाहिजे. वर्धा शिक्षण-योजनेंत या घटकांचा समावेश करण्याचा यशस्वी प्रयत्न केला आहे.

शिक्षणाकडे आणखी एका दृष्टीने पाहतां येईल. मुलांची बुद्धि, भावना, आरोग्य व उपजीविका या सर्वांना पूर्णतया वाव देणारें शिक्षण तेंच राष्ट्रीय शिक्षण होऊं शकेल. सांप्रतच्या शिक्षणांत बुद्धीवरच भर दिला जातो. भावना, आरोग्य आणि उपजीविका यांचा संबंध फारच अल्प प्रमाणांत या पद्धतींत विचारांत घेतला आहे. जीवनद्वारा द्यावयाच्या शिक्षणांत असें होणें अनुचित असल्यामुळे भावनांबरोबर शरीराचाहि विकास व त्याबरोबर उपजीविकेचाहि प्रश्न विचारांत घेणें प्राप्त होतें. या दृष्टीने प्रस्तुत पुस्तकांतील आचार्य कृपलानी, श्री. रिचर्ड ग्रे, आचार्य भागवत यांचे लेख वाचनीय ठरतील. मूलोद्योगावर वर्धा शिक्षण-योजना आंखली असल्यामुळे कोणत्या भागांत कोणता मूलोद्योग असावा याबद्दल मतभेद झाला तरी तत्त्व मान्य झाल्यानंतर तपशीलाचें भांडण सहज मिटविण्याजोगें आहे. स्वावलंबनाने तयार झालेले राष्ट्रीय विचारांचे नागरिक आपल्या देशाचा उद्धार लवकर करूं शकतील व शिक्षणाचें ध्येय लवकर गांठूं शकतील, हीं तत्त्वें प्रस्तुत पुस्तकाच्या "सिद्धांत-खंडां"त सोप्या भाषेंत व तर्कशुद्धतेने विवेचिलीं गेलीं आहेत.

प्राथमिक शिक्षणाचा दर्जा सुधारला म्हणजे शिक्षण-वृक्षाचीं मुळें जीवनरसाचें शोषण चांगल्या तऱ्हेने करूं लागतील व असें झालें म्हणजे त्या शिक्षण-वृक्षाच्या फांद्या (दुय्यम शिक्षण) पुष्ट होतील आणि त्या वृक्षाला येणाऱ्या फुलांच्या व फळांच्या बहराने (उच्च शिक्षण) दशदिशा दरवळून जातील यांत शंका नाही.

प्रस्तुत पुस्तकाचा दुसरा भाग म्हणजे साहित्य-खंड. तत्त्वज्ञान-खंड मनाला पटतो, परंतु आचार-तुल्य साहित्य-खंडांत निवडून दिलेले भाग म्हणून त्यांतील विषयांवर दृष्टि फिरविली तर थोडीशी निराशा होते, आणि याचें कारण वर्धा शिक्षण-योजना ही नसून, त्या योजनेचें हृद्गत समजून घेतलेल्या शिक्षकांचा अभाव, असें म्हणावें लागतें. राष्ट्रीय-दृष्ट्या बालमनाचा विकास घडवून आणतांना आर्यावर्ताच्या प्राचीन संस्कृतीकडे दुर्लक्ष करणें अक्षम्य ठरेल. चीन देशांत काय होतें आणि हिब्रू पुरुषांच्या आदि-पुरुषांचें काय झालें या गोष्टींपेक्षा रामायण, महाभारत, भागवत इत्यादि महाग्रंथांतील आदरणीय व्यक्ति व एकनाथांसारखे विश्वबंधुत्व आचरणारे साधुसंत यासंबंधीच्या पाठांनी आपल्या विद्यार्थ्यांचीं मनें अधिक प्रफुल्लित होणार नाहीत का ? याचा अर्थ परकीय महाविभूतींची माहिती आपल्याला नको असा नाही. परंतु तत्तुल्य स्वकीयांपेक्षा परकीयांवरच भर देण्याचा दुराग्रह कांही ठिकाणीं स्पष्ट दिसला व प्रस्तुत साहित्य-खंडांतहि सात परकीय गोष्टी असून चारच स्वकीय गोष्टी असाव्यात ही गोष्टहि विषादाला कारणीभूत झाली आहे.

इतकें असलें तरी प्रस्तुत पुस्तकाचें मूल्य अणुमात्रहि कमी होत नाही. महाराष्ट्रांतील शिक्षणतज्ज्ञ व शिक्षणप्रेमी स्त्री-पुरुष यांनी हें पुस्तक अवश्य वाचावें व प्राथमिक शिक्षणक्षेत्रांत सांप्रत चालू असलेला

" हेदोस " थांबविण्याचा अवश्य प्रयत्न करावा. आचार्य भागवत यांनी वर्धा शिक्षण-योजनेसंबंधी हा ग्रंथ मोठ्या सायासाने तयार केला ही गोष्ट केव्हाहि अभिनंदनीयच ठरेल.

प्राथमिक शिक्षणांत इष्ट बदल होत जावा व तें अधिकाधिक उपयुक्त व्हावें असें वाटत असल्यास शिक्षण-क्षेत्रांतच बदल होऊन भागणार नाही तर समाजांतहि एक महत्त्वाचा बदल झाला पाहिजे, ही गोष्ट विसरून चालावयाचें नाही. आजचे पालक शिक्षणाच्या बाबतींत उदासीनतेच्या पराकाष्ठेला जाऊन पोंचले आहेत. शिक्षणाचें उच्चतम ध्येय साध्य होण्यास ही गोष्ट अत्यंत विघातक आहे. वेळ अशी आली आहे की शाळेंत येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या पालकांसाठी म्हणून कांही निराळें " बौद्धिक " सांगावें लागत आहे, आणि याच गोष्टीचा उपन्यास बालशिक्षणाला जीवन वाहिलेल्या महाराष्ट्रांतील प्रसिद्ध विदुषी ताराबाई मोडक यांनी " पालकांसाठी " प्रस्तुत दोन पुस्तकें लिहून केला आहे. दिवसाचा फारच थोडा भाग मुलें शाळेंत असतात आणि उर्वरित बहुतेक सर्व भाग पालकांबरोबर जात असल्यामुळे मुलांच्या मनावर होणारे शालेयेतर संस्कार अधिक बलवान् ठरतात. शाळा हें घर झालें पाहिजे हें म्हणणें जितकें सयुक्तिक आहे, तितकेंच घर ही सुद्धा शाळा आहे हें पालकांनी— विशेषत: मातांनी— जाणलें पाहिजे. मुलांच्या व्यक्तिमत्त्वाचा विकास होण्याच्या आड सध्याची गृहस्थिति येत आहे हें ध्यानांत घेऊन मुलांच्या ठिकाणीं गृहपरिस्थितीमुळे अजाणतां उत्पन्न होणारे वाईट संस्कार न होऊं देण्याची खबरदारी पालकांनी घेणें किती इष्ट आहे ही महत्वाची गोष्ट प्रस्तुत दोन्ही पुस्तकांत कथारूपाने अत्यंत सोप्या भाषेंत लेखिकेने विशद केली आहे. मुलांच्या ठिकाणीं उत्पन्न होणाऱ्या द्वेषादि भावना, अकारण भीति, हट्ट, तोंडीं असलेल्या शिव्यागाळी इत्यादि दोष कसे टाळता येतील हें प्रस्तुत पुस्तकांत विवेचित केलें आहे. आदर्श गृह, आदर्श शाळा आणि आदर्श शिक्षण या त्रिवेणी-संगमानेच राष्ट्र उन्नतीला जावयाचें असल्यामुळे प्रस्तुतांसारख्या अनेक पुस्तकांचीसुद्धा आपल्या समाजाला आवश्यकता आहे.

वा. दा. गोखले

## साहित्यः—

जीवन आणि साहित्यः— ले० आचार्य भागवत; प्रका० सुलभ राष्ट्रीय ग्रंथमाला, पुणें २; मूल्य रु. २॥.

आचार्य भागवत यांच्या ३१ लेखांचा हा संग्रह आहे. यांतील कांही लेख आकाराने छोटे असले तरी विचाराने सर्वच कणखर आणि बलिष्ठ आहेत. येथे रवींद्रनाथ, टॉलस्टॉय, रोमाँरोलाँ, कृपलानी यांच्या लेखांचे अनुवाद आहेत; शिवरामपंत परांजपे, आचार्य जावडेकर, साने गुरुजी, महात्मा गांधी, रवींद्रनाथ ठाकूर, नाना काणे, लो. टिळक, समर्थ रामदास यांचीं शब्दचित्रें व त्यांच्या जीवनाचें आणि साहित्याचें मूल्यमापन आहे, आणि स्वतः आचार्य यांचें जीवनविषयक तत्त्वज्ञान मांडणारे ' जीवनाचें साफल्य ' व ' उद्याची संस्कृति ' यांसारखे लेख आहेत. हे सर्वच लेख मार्मिक आणि मूलग्राही विचारांनी ओथंबून भरलेले असून त्यांना प्रकट करणारी भाषाहि स्वल्पाक्षरांनी बह्वर्थ व्यक्त करणारी, प्रौढ आणि अर्थवती अशी आहे.

कविवर्य रवींद्रनाथ ठाकूर यांच्या सत्तराव्या वाढदिवशीं त्यांचा सत्कार करण्याचा मोठा समारंभ करण्यांत आला, त्या प्रसंगीं आपल्या जीवनयात्रेचें समालोचन करणारें जें हृदयस्पर्शी भाषण कविवर्यांनी केलें त्याच्या अनुवादाने प्रस्तुत लेखसंग्रहास प्रारंभ होतो. या भाषणामध्ये रवींद्र म्हणतात, " देश ही मानवी सृष्टि होय. देश मृण्मय नसतो, तो चिन्मय असतो, यासाठी स्वतःच्या अस्तित्वाचें प्रमाण म्हणून जे कोणी एखाद्या साधनेमध्ये चरितार्थ झाले असतील अशा पुरुषांकडेच तो अहर्निश पाहत असतो. माझ्या या जयंति-समारंभामध्ये कांही सत्य असेल तर तें याच अर्थाने. पण सध्या पाश्चात्य देशांत साहित्यामध्ये लोकांची अभिरुचि बदलत असल्याचें दिसून येतें, हें लक्षांत घेऊन या वयांत मी कीर्तीचा विश्वास धरीत नाहीं असें म्हणतो. पण फुलांचें साफल्य त्यांच्या आविर्भावांतच असतें. सौंदर्याच्या

संपर्काने हृदयांत जो अनुराग भरून राहतो, त्या अनुरागाने मानवी चैतन्याला उद्दीपित करणें हें कवीचें काव्य होय. काव्याचे चिरकालिक विषय हे आधुनिक काळीं जुनेपुराणे होऊन गेले आहेत असें वाटूं लागलें असेल तर आधुनिक कालच रसहीन झाला असें आम्ही समजूं. मला आशा आहे की ज्यांनीं मला जाणण्याचा प्रयत्न केला असेल, त्यांना येवढें कळून आलें असेल की मी जीर्ण जगांत जन्म घेतलेला नाही. चराचराला वेष्टन करून अनादिकालाची जी अनाहत वाणी अनंत कालाकडे वाजत चालली आहे तिला मी आपल्या प्राण-मनांनी साथ देत आलों आहें. मी या जगतावर प्रेम केलें आहे, परम-पुरुषाला आत्मनिवेदन करून लाभणाऱ्या मुक्तीची कामना केली आहे." अशा शब्दांत कविवर्यांनी आपल्या साहित्याचें रहस्य सांगितलें आहे. रवींद्रांच्याच तोलाचे रशियांतील श्रेष्ठ साहित्यिक टॉलस्टॉय यांच्या-विषयीं रोमाँरोलाँ लिहितात की, 'सर्व प्रकारच्या पूर्व-ग्रहांपासून मुक्त असा मुक्तात्मा ही दुर्लभ वस्तु आहे. टॉलस्टॉय हे या प्रवृत्तीचें फार मोठें उदाहरण होय. दुष्टांच्या सामर्थ्यापेक्षा सज्जनांचें दौर्बल्य हाच जगाला जडलेला मोठा रोग आहे. स्वतंत्र विचाराच्या भयामुळे हा दोष उत्पन्न होतो. मोठे धैर्यवान लोकहि रूढ विचारांच्या पहिल्या शृंखलांचा त्याग केल्यावर दुसऱ्या शृंखलांत आनंदाने स्वतःस अडकवून घेतात.' खुद्द टॉलस्टॉय हे फ्रेंच साहित्यिक मोपासाँ यांच्या साहित्याचें मूल्यमापन करितांना सांगतात की, 'जीवनांतील मांगल्याची यथार्थ जाणीव, प्रासादिक रचना आणि अंतरींची कळकळ या श्रेष्ठ साहित्याच्या तीन कसोटया होत. या कसोटया लावून मोपासाँचें साहित्य पारखलें असतां तें तीन अवस्थांतून गेलेलें दिसतें. पहिल्या अवस्थेंत मोपासाँला निराशेनें ग्रासलें होतें. या अवस्थेंत कामगार स्त्रियांना कामुकता आणि वात्सल्य या दोनच भावना समजूं शकतात असें या स्त्रियांचें तो चित्रण करी. दुसऱ्या अवस्थेमध्ये सद्‌गुणांविषयी प्रेम आणि दुर्गुणांविषयी तिरस्कार हीं उत्कटत्वाने उसळूं लागलीं. तिसऱ्या अवस्थेमध्ये तो विलासाचीं आणि दुर्गुणांचीं वर्णनें करण्यांतच कृतार्थता मानूं लागला.' हें अधःपतन कां घडून आलें? टॉलस्टॉयचें उत्तर असें की मोपासाँला स्तुति आणि संपत्ति हीं दोन्ही अलोट मिळालीं आणि त्याचा कैफ चढल्यामुळे जीवनाकडे ध्येयवादी दृष्टीने पाहण्याची धमक पांगुळली.— अनुवादित लेखांत अशा प्रकारचीं विचार-रत्नें सर्वत्र विखुरलेलीं आहेत.

प्रस्तुत संग्रहाचा दुसरा भाग म्हणजे थोर साहित्यिकांच्या जीवनाचें आणि साहित्याचें आचार्यांनी केलेलें मंथन हा होय. या मंथनांतून जें नवनीत ते आपणास अर्पण करीत आहेत तें असें की रवींद्रांच्या भव्य जीवनविभूतीचा पाया म्हणजे मानव-प्रेम हा होय. जावडेकरांची परिणतप्रज्ञावस्था म्हणजे 'समाजवाद हा सत्याग्रहाच्या अहिंसक मार्गानेच यशस्वी होऊं शकेल' हा निर्णय ही होय; 'विद्याभिरुचि, स्वातंत्र्यप्रीति, आणि आत्मिक शुचिता यांचा ह्व्यास हे साने गुरुजींच्या जीवनाचे व साहित्याचे विशेष होत.' लोकमान्य टिळक व समर्थ रामदास यांनी कर्मयोग व नेटका संसार यांचा उपदेश केला त्याचा अर्थ धूर्त लोक वैयक्तिक स्वार्थाकरिता कर्म करीत राहावें व स्वतःचा संसार उत्तम थाटावा असा करीत असतात. पण आचार्य त्यांना बजावून सांगतात की, कर्मे निःस्वार्थ बुद्धीने करणें म्हणजेच कर्मयोग व समाजाच्या धारणेला आणि पोषणाला उपकारक होईल अशा रीतीने केलेला संसार तोच नेटका संसार' होय. या भागांतील शिवरामपंत परांजपे यांच्यावरील लेख विशेष चिकित्सक आणि मार्मिक असा उतरला आहे. शिवराम-पंतांचें असामान्य वक्तृत्व, उच्चारशुद्धीविषयी त्यांचा कळकळीचा कटाक्ष, त्यांची श्रेष्ठ कलोपासना या सर्वांचें आचार्यांनी मोठें रसमय वर्णन केलें आहे.

शिवरामपंतांच्या जीवनाचें पर्यालोचन करितांना एक महत्त्वाचें विधान आचार्यांनी केलें आहे तें उद्धृत करून प्रस्तुत संग्रहांतील तिसऱ्या भागाकडे वळतों. शिवरामपंतांच्या विषयींचें तें विधान आचार्य भागवत यांची भूमिका समजण्यास उपकारक होईल. शिवरामपंतांविषयी भागवत लिहितात की "शिवराम-पंत बुद्धीने तर्कवादी आणि भावनेने आस्तिक होते. बुद्धिवादाने मनुष्य अज्ञेयवादी बनतो. आस्तिक्याच्या अनुभूतीसाठीं शुद्ध भावनांची आणि उच्च श्रद्धेची आवश्यकता लागते. आस्तिक्याचा नाश होणार नाही असा बेताने ते आपली तर्कशक्ति चालवीत!" आचार्य भागवत यांची बौद्धिक बैठक शिवरामपंतांच्या

या बैठकीसारखीच आहे; म्हणजे माझ्या दृष्टीने कांहीशी घरसोडीच्या बुद्धिवादाची आहे. ती भूमिका समजून घेण्याच्या दृष्टीने या संग्रहांतील 'जीवनाचें साफल्य', 'उद्याची संस्कृति', 'ध्येयवादी जीवन' व 'व्यासांचा आक्रोश' हा लेखचौकुला मननपूर्वक वाचण्याजोगा आहे. तो वाचीत असतां असें दिसतें की बुद्धिवादाच्या मार्गावर कांही अंतर ते ताठ सपासप पाउलें टाकीत असलेले आढळून येतात. हीं पाउलें टाकीत असतां आजूबाजूला सर्वत्र माजून राहिलेल्या चिररूढ आचारविचारांच्या आवाजांनी त्यांचें चित्त विचलित होत नाही. बुद्धिवादाच्या आगीनें मार्गांतील कांटेरी झाडें जाळून काढण्यास ते कचरत नाहीत. समाजांतील आजची आर्थिक, सामाजिक, राजकीय, सर्व क्षेत्रांतील विषमता ही पूर्णतेनें नष्ट केली पाहिजे असें ते रोखठोक सांगतात. पण अध्यात्माचे, आस्तिक्याचे, अन्तःप्रेरणेचे मंजुळ ध्वनि ऐकूं येऊं लागले की मात्र आचार्यांच्या बुद्धिवादाचे पाय मरगळूं लागतात व पुढील मार्ग सोडून देऊन पाहतां पाहतां ते गूढवादाच्या घुक्यांत शिरून बैठक मारतात. भागवत लिहितात की 'मानवी जीवनांतील सर्व प्रवृत्तींचें स्वरूप शुद्ध होऊन त्यांतील विरोध नष्ट होणें ही मानवी संस्कृतीची कल्पना होय. जीवनाची प्रगति आणि संस्कृति यांचें स्वरूप वर्धिष्णु असणार, त्यासाठीं अखंड साधना चालविली पाहिजे. जीवन-दर्शन पूर्ण होण्यासाठी मनुष्यानें आपल्या सर्व शक्तींचा योग्य विनियोग केला पाहिजे. दर्शन हें केवळ बौद्धिक नाही. तो अनुभव आहे. कल्पनांचें सत्यत्व पारखण्याची सोय जर जीवनांत नसेल तर कल्पना भ्रमात्मक होण्याचा संभव आहे.' हे आचार्यांचे उद्गार खणखणीत बुद्धिवादाचे आहेत. हा शास्त्रज्ञांचा बुद्धिपूत, प्रयोगपूत मार्ग होय. शास्त्रज्ञ हा कल्पना मांडूनच प्रयोगाला सुरवात करतो. पण त्यांपैकीं प्रयोगाच्या सत्यतेंत टिकतील तेवढ्यांचाच स्वीकार करितो. प्रयोगास ततोतंत उतरण्याच्या दृष्टीने जेवढी उणीव असेल तेवढी तो प्रामाणिकपणे नमूद करून ठेवतो व तीहि उणीव भरून निघेल अशी नवी उपपत्ति सुचल्यास पहिली दीर्घकाल स्वीकारलेली उपपत्तीहि सोडून देण्यास तो तयार होतो. भौतिक शास्त्राची अभिमानास्पद वाढ झालेली आहे ती या प्रयोगनिष्ठ अनुभवावरून उपपत्तीकडे जाण्याच्या मार्गानें झालेली आहे. जीवनाच्या तत्त्वज्ञानाचा शोध चालू ठेवतांनाहि हीच शास्त्रीय दृष्टि स्वीकारली पाहिजे. ती हीच की जीवनविषयक तत्त्वज्ञानाच्या सत्यासत्यतेची पारख ही शेवटीं जीवनांतील प्रत्यक्ष अनुभवावरूनच केली पाहिजे. शास्त्रीय शोधकाप्रमाणे जीवनाचा शोध करणारालाहि कांही कल्पना घेऊनच मार्ग आक्रमण्यास प्रारंभ करावा लागतो; पण ज्या कल्पना प्रयोगाला उतरणार नाहीत त्या सोडून देण्याचें श्रेष्ठ धारिष्ट ज्याप्रमाणे शास्त्रज्ञाला जागवावें लागतें, त्याप्रमाणे जीवनाच्या शोधकानें तें जागविलें पाहिजे. हा बुद्धिवादाचा मार्ग होय, व त्याला जीवनांतील साधनेची तपस्या करण्याची तयारी लागते. आचार्य भागवत हे स्वतः साधनोपासक आहेत यादृष्टीनें त्यांनी शिवरामपंतांविषयीं जें लिहिलें आहे की 'शिवरामपंतांच्या हृदयांत आशा-निराशांचे शुक्ल-कृष्णपक्ष सदैव चालू असत. कारण, कल्पनेला कर्तृत्वाची जोड नसली म्हणजे तिचा आवेश लुला होतो.' तें अर्थपूर्ण आहे. पण आचार्यांची ही भूमिका सर्वत्र टिकून राहिलेली नाही. नाही तर बर्नार्ड शॉच्या जीवनांतील उणीव त्यांनी नीट ओळखली असती. भागवत लिहितात, शॉला वाटलें की समाजांतील सर्व वर्गांत पुरेसें ज्ञान पसरविलें की अन्याय आणि विषमता गळून पडेल, पण दोन तऱ्हें या तऱ्हेने उद्योग केला असतांहि इष्टसिद्धि झाली नाही, तेव्हा शॉनें घोषणा केली की आदर्श समाजाच्या निर्मितीला आजचा मानवप्राणी हा स्वभावतःच अपात्र आहे.' या शॉच्या घोषणेवर भागवतांनी असा शेरा मारला आहे की 'केवळ बुद्धिवादाच्या पराभवाची ही स्पष्ट कबूली आहे.' बुद्धिवाद ही संज्ञा या विधानांत ढिलेपणाने वापरली गेली आहे व त्यामुळे बुद्धिवादाच्या भूमिकेविषयीं गैरसमज होण्यासारखा आहे. केवळ बुद्धिवाद किंवा कृतिहीन बुद्धिवाद असा निराळा कांही पोटभेद कोणी करीत नाहीत. बुद्धिवादाच्या पांडित्यानें जगांतील विषमता नाहीशी होईल असा बुद्धिवादाचा दावाच नाही मुळीं. जगांतील वैषम्य दूर करण्यास प्रत्यक्ष झगडलेंच पाहिजे, आणि त्या झगडण्याचे डावपेंच प्रत्यक्ष झगडूनच शिकले पाहिजेत असेंच बुद्धिवादी म्हणेल. शॉ वैतागला याचें कारण जीवनाच्या आखाड्यांत उतरून स्वतः झगडण्याची व लोकांना झगडण्यास शिकविण्याची धडाडी शॉमध्ये नव्हती म्हणून; बुद्धिवाद खोटा ठरला म्हणून नव्हे. बुद्धिवादी म्हणजे बुद्धीशीं खेळत बसणारा असें कोणी म्हटलें तर श्रद्धावादी म्हणजे श्रद्धा उगाळीत बसणारा असें म्हणावें लागेल. पण

हीं दोन्ही वर्णनें विडंबनात्मक होत. प्रामाणिक बुद्धिवादी आणि प्रामाणिक श्रद्धावादी यांच्यामध्ये कर्तृत्वाच्या दृष्टीनें फरक नाहीं. फरक आहे तो कर्तृत्वाचें क्षेत्र निवडतांना बुद्धि ही सर्वश्रेष्ठ निर्णायक मानावयाची कीं नाहीं याबद्दल आहे. भागवत लिहितात 'आधुनिक काळीं पाश्चात्य देशांत बुद्धिपूजेचें पुनरुज्जीवन मोठ्या उत्साहानें करण्यांत आलें आहे, परंतु या बुद्धिपूजकांची श्रद्धा प्रत्यक्ष व्यवहारांत बहुतांशीं विफल ठरलेली सध्या दिसत आहे' आणि या वैफल्याचें उदाहरण म्हणून त्यांनी शॉचें उदाहरण दिलें आहे. पण रशियांतील समाजवादी क्रांतिकारकांची कां त्यांना आठवण झाली नाहीं ! तेहि बुद्धिवादीच आहेत ना ? पण शॉप्रमाणें बुद्धिवादाचें नुसतें पांडित्य घोटणारे ते नव्हते. बुद्धीला पटलेलीं तत्त्वें व्यवहारांत उतरून दाखविण्याची व त्याकरितां सोसावयास लागणाऱ्या हालअपेष्टा सोसण्याची त्यांची तयारी होती, म्हणून शॉप्रमाणें हताशपणानें कपाळाला हात लावीत न बसतां आपलीं तत्त्वें कांहीं प्रमाणांत तरी व्यवहारांत चालतीं बोलतीं करून त्यांनीं दाखविलीं. आतां रशियांतील समतावाद किंवा पाश्चात्यांतील बुद्धिवाद हा भागवतांना अमान्य आहे असेंहि नव्हे. 'समर्थांचें स्मरण' या लेखांत ते लिहितात कीं 'आजच्या अनुभवानें मागच्या इतिहासाकडे पाहूं लागलों म्हणजे वाटतें कीं युरोपांत उत्पन्न होणाऱ्या नव्या संस्कृतीची कल्पना आमच्या ज्ञात्यांस वेळींच झाली असती तर भारतीय समाजाला वेगळें वळण मिळालें असतें. युरोपांत भौतिक शक्ति उत्पन्न होत होती. पण त्याचे आधीं तेथे बुद्धिवाद व समता यांचा प्रत्यक्ष समाजरचनेंत प्रवेश करून देण्याचा जोराचा प्रयत्न चालला होता, आणि आंधळेपणानें आणि भोळसटपणानें आमच्यांतले ज्ञातेहि भयंकर अज्ञानांत राहून गेले होते. त्यांच्या अज्ञानाचा परिणाम आज आपण भोगीत आहोंत.' हे खणखणीत बुद्धिवादाचे बोल होत. मग शॉच्या उदाहरणावरून बुद्धिपूजकांना हटाग्रहांत हंशील काय ! पण हे असे विसंगत सूर निघतात याचें कारण भागवतांचा बुद्धिवाद हा अध्यात्माच्या आणि गूढवादाच्या छायेंतून पूर्णपणे स्वतंत्र झालेला नाहीं हें दिसतें. 'ध्येयवादी जीवन' या लेखांत भागवत लिहितात 'अध्यात्मवादाविरुद्ध सध्या बुद्धिवादाचें बंड उभारण्यांत येत आहे. पण वस्तुतः या दोहोंमध्ये विरोध असण्याचें कारण नाहीं. मनुष्य आपल्या आंतरींच्या प्रेरणेमुळे विविध ध्येयें निर्माण करितो. या प्रेरणा बुद्धिनिर्मित म्हणतां येणार नाहींत. त्या अतिबौद्धिक असल्यामुळे बुद्धीला त्यांचेवर कुरघोडी करतां येत नाहीं. या प्रेरणांचें स्वरूप समजून घेऊन त्यांच्या सिद्धीसाठीं साधनांची निर्मिति करणें इतकेंच बुद्धीचें क्षेत्र आहे.' आचार्य म्हणतात त्याप्रमाणें बुद्धीचें क्षेत्र येवढें संकुचित नसून मूळच्या प्रेरणांपैकीं स्वार्थी आणि निःस्वार्थी प्रेरणा कोणत्या हें पारखून घेणें, व निःस्वार्थी प्रेरणांची बुद्धिपुरस्सर जोपासना करणें आणि स्वार्थी प्रेरणांना निराळें वळण देणें ही बुद्धीची श्रेष्ठ कामगिरी होय. मनुष्याच्या कर्तृत्वाला चालना मिळते ती आंतर-प्रेरणांमुळे, पण या कर्तृत्वानें कोणती दिशा घ्यावी हें ठरविण्याचें काम बुद्धीचें. मग या बुद्धीच्या मार्गदर्शकत्वाला कुरघोडी म्हणा वा न म्हणा. आंतर-प्रेरणा या निःस्वार्थी व ध्येयवादाच्याच असतात असें जें आचार्यांच्या वरील विधानांत गृहीत धरलेलें आहे तेंच मुळीं विवाद्य आहे. आंतरप्रेरणेनें पाप कोणतें आणि पुण्य कोणतें हें कळतें तर नीतिशास्त्रांतील कूटें फारच सोपीं झालीं असतीं. प्रेरणावादी म्हणेल कीं वाटेल त्याची प्रेरणा नव्हे, तर शुद्ध अन्तःकरणवानाची प्रेरणा असें आम्ही म्हणतों. पण शुद्ध अन्तःकरण कशानें ठरवावयाचें ? तर आपण आधीं जें पाप आणि पुण्य म्हणून ठरविलें आहे त्याच्याशीं ज्याची प्रेरणा जुळेल तें ! असें हें चक्रक आहे. त्यापेक्षा नैतिक कल्पना या अन्तःकरणाच्या प्रेरणा नसून सामाजिक जीवनांत जो अनुभव येतो त्या अनुभवावरून समाजाचें म्हणजे सर्वांचें सुख ज्यांत साधेल तें पुण्य, आणि अनेकांना दुःखांत लोटून कांहींचें सुख साध्य करील तें पाप असें प्रतिपादन करणें हें बुद्धिवादास धरून होय.

मग असा पक्ष न मांडतां आंतर-प्रेरणेवर भर देण्याची आवश्यकता कां वाटते ? त्याचें कारण या आंतर-प्रेरणा 'आत्म्याच्या' होत असें अध्यात्मवादी मानतात हें होय. भागवतांचाहि तोच पक्ष आहे. ते लिहितात कीं आंतर-प्रेरणा हेंच आत्म्याचें स्थान होय. हा पक्ष स्वीकारला म्हणजे बुद्धीला कार्याकार्यनिर्णयाचें कांहीं क्षेत्रच उरत नाहीं. आत्म्याच्या प्रेरणा या अशुद्ध असूंच शकणार नाहींत. आणि तसें असेल तर त्या प्रेरणांच्या सफलतेचीं साधनें जुळविणें येवढेंच दुय्यम काम बुद्धीला करावें लागेल. पण आंतर-प्रेरणा या सुष्ट आणि दुष्ट अशा दोन्ही प्रकारच्या असतात. निदान सामान्य माणसांचा तरी

असा अनुभव असतो. ज्ञानलालसा ही जशी आंतर-प्रेरणा आहे, तशी वर्चस्व गाजविण्याची लालसाहि आंतर-प्रेरणा आहे. या दुसऱ्या प्रेरणेला कह्यांत ठेवण्याला बुद्धिपुरःसर प्रयत्न करावा लागतो. किंबहुना मूळ अन्तःप्रेरणांना नवीन वळण देणें यांतच मानवाचें मानव्य अथवा कार्याकार्यविवेकश्रेष्ठत्व आहे. स्त्रीमात्र दृष्टीस पडली की कामुक होणें ही अन्तःप्रेरणा, पण त्या प्रेरणेला स्वस्त्रीविषयावरच नियंत्रित करणें ही जागत्या बुद्धीची कामगिरी होय. यामुळे आंतर-प्रेरणा या आत्म्याच्या प्रेरणा होत असें मानणें म्हणजे आत्म्याविषयीच्या कल्पनेला प्रबलत्व आणणें होय. टिळकांनी गीतारहस्यांत बुद्धिवाद आणि अध्यात्मवाद यांची सांगड घालतांना सर्वभूतीं आत्मभाव हें अध्यात्माचें तत्त्व आणि सर्व सुखी व्हावे हें बुद्धिवादाचें तत्त्व यांना एकत्र आणण्याचा प्रयत्न केला आहे. पण त्यांनी अन्तःप्रेरणेला नसतें महत्त्व दिलेलें नाही. बुद्धिवादाच्या दृष्टीने पाहिलें तर सर्वभूतीं आत्मभाव हें तत्त्व न स्वीकारतांहि नीतीची उभारणी उत्तम रीतीने करतां येण्यासारखी आहे. त्यामुळे टिळकांचा एतद्विषयक आग्रह हाहि बुद्धिवादाला पटण्यासारखा नाही. भागवत लिहितात ' जीवनाच्या मांगल्यावरील, जीवनाच्या अर्थपूर्णतेवरील श्रद्धा वाढत गेली पाहिजे. बुद्धिवादी म्हणेल जीवन हें मूळचेंच मंगलमय आहे की नाही हें मला समजण्याचें साधन नसल्याने त्याच्यावर मी श्रद्धा ठेवूं कशी ! आणि जीवनाचा मूळचा अर्थ काय आहे, म्हणजे ज्याने हें विश्वचक्र निर्माण केलें त्याच्यापुढे कांही योजना-विशेष होती की काय हेंहि शोधून काढणें माझ्या बुद्धीच्या आवाक्याबाहेरचें आहे म्हणून जीवनाच्या अर्थपूर्णतेवरहि मी श्रद्धा ठेवूं शकत नाही. पण मी एक सांगतों की जीवनांतील मांगल्याचा अर्थ काय असेल तो असो, माझ्या दृष्टीने जें मंगल म्हणून मला वाटतें की ज्याच्यामुळे सर्व समाज सुखी होईल तें मांगल्य जीवनांत आणण्याचा मी आटोकाट प्रयत्न करीन आणि तेंहि कां तर सर्वांच्या सुखांतच माझें सुख सामावलें आहे हें मला पटूं लागलें आहे म्हणून. मग तुम्ही मला स्वार्थी म्हटलेंत तरी हरकत नाही. जीवन मूळचें मंगल आहे की नाही कोणास ठाऊक, पण माझ्या कल्पनेप्रमाणे तें मांगल्य जीवनांत उतरविण्याचा प्रयत्न मात्र मी करणार आहें. आणि येवढें तत्त्व मला पुरें आहे. भागवत लिहितात 'जीवनाचा असा एक सिद्धांत समजण्यास हरकत नाही की अत्यंत सत्यनिष्ठेने आपण आपल्या अंतरींचीं स्फुरणें जर तपस्यापूर्वक श्रवण केलीं, आणि श्रद्धेने त्यांच्या सिद्धतेसाठी आपण साधना करूं लागलों तर त्या साधनेंतच आपल्या स्फुरणांचीं अशुद्धरूपें नाहीशीं होऊं लागतात. अंतरींची हाक न लाजतां न भितां ऐकणाऱ्या हृदय-देवाच्या पूजनांत आपलें सर्वस्व अर्पणाऱ्या भक्ताला जीवनाने दगा दिल्याचा दाखला अद्याप उपलब्ध नाही, जीवनाशीं जर आपण प्रतारणा करणार नाही तर जीवनहि आपणांशीं प्रतारणा करणार नाही.' आचार्यांच्या काव्यमय आणि ठांशीव प्रतिपादनाचा हा एक उत्तम नमुना आहे. पण त्यांतील सिद्धांत प्रत्ययोत्पादक नाहीत. वरील उताऱ्यांत अन्तःकरणाचीं स्फुरणें हीं अशुद्ध असून हळूहळू शुद्ध होत जातात असें विधान आहे. पण शुद्ध कोणतीं आणि अशुद्ध कोणतीं हें जीवनांतील अनुभवांवरून ठरविण्याचें काम बुद्धीचेंच ना ! अंतरींची हाक न लाजतां न भितां ऐकावी या प्रतिपादनांतील धैर्यांचा आदर्श योग्य आहे. पण कोणती प्रेरणा ऐकावी व कोणती ऐकूं नये याचा विवेक नसेल, तर या धैर्याने अनवस्था प्रसंग ओढवेल. आणि हा विवेक सामाजिक जीवनाच्या अनुभवावरून बुद्धीने करावयाचा असतो. आंतरिक स्फुरणें हीं जातितः शुद्धहि नसतात, व अशुद्धहि नसतात. तीं फक्त स्फुरणें असतात. त्यांपैकी कोणत्या स्फुरणांचा पुरस्कार करावयाचा व कोणतीं दडपून टाकावयाचीं हें सामाजिक जीवनांतील अनुभवावरून बुद्धि ठरवीत असते. बुद्धीचा असा पहारा शतकानुशतकें जागता ठेवून मानवाने आपल्या आंतरिक स्फुरणांना कह्यांत आणलें आहे, वा इष्ट दिशेला वळविलें आहे. आंतरिक प्रेरणांतून माणसाच्या कार्यकर्तृत्वाला लागणाऱ्या शक्तीचा पुरवठा केला जात असतो, पण कार्य कोणतें करावें हें त्याच्या अनुभवावरून शहाण्या होत जाणाऱ्या बुद्धीने ठरवावें लागतें. आंतरिक स्फुरणें हीं शुद्ध होत जात नाहीत, तर बुद्धीच्या अहर्निश आघाताने तीं तशीं करावीं लागतात, म्हणूनच जन्मास आलेल्या प्रत्येक नव्या अर्भकावर लहानपणापासून नीतितत्त्वें बिंबविण्याचा सहेतुक प्रयत्न करावा लागतो, आणि अशा प्रयत्नांचा मारा सारखा घरांत आणि शाळेंत सुरू असला म्हणजे नीतीच्या कल्पना या स्वतःसिद्ध होत अशी भूल उत्पन्न होते. असो. हें बुद्धिवादाचें पुराण परीक्षणाच्या मर्यादेंत अधिक

लांबविणें' इष्ट नव्हे. पण आचार्यांनी 'जीवनाचें साफल्य' या लेखांत म्हटलें आहे की 'मानसिक सृष्टींत पुंडावा करणाऱ्या अनेक भ्रामक वृत्तींना आपण प्रखर बुद्धिकिरणांखाली भाजून काढलें पाहिजे' म्हणून आचार्यांच्या प्रखर बुद्धीने पेटविलेल्या होमाग्नीला चारदोन समिधा अर्पण कराव्या म्हणून वरील विचार सादर केले आहेत.

द. के. केळकर

## वाङ्मयेतिहासः—

**संस्कृत काव्यवाङ्मय**— ले० प्रो. रा. श्री. जोग; प्रका० लोकशिक्षण लघुग्रंथ माला, पुणें; किं. २॥ रुपये.

संस्कृत भाषेंतील मेघदूत, रघुवंश, कुमारसंभव, गीतगोविंद, शतकत्रय वगैरे काव्यांचीं गद्य-पद्यमय भाषांतरें व सारांश मराठींत झालेलीं आहेत. चिंतामणराव वैद्य यांचें संस्कृत वाङ्मयाचा अितिहास, व मॅक्डोनेल्डच्या पुस्तकाचें भाषांतर हींहि मराठी वाचकांपुढे आहेत. प्रस्तुतच्या ग्रंथाचा अुद्देश कोणा एका ग्रंथाच्या भाषांतराचा नाही, व संस्कृत भाषेंतील समग्र वाङ्मयाचा आढावा घेण्याचाहि नाही. त्याचा अुद्देश संस्कृतमधील शाकुंतलादि नाटकें किंवा बाणाच्या कादंबरीसारखे गद्य ग्रंथ, वेदांतील सूक्तें किंवा रामायण-महाभारत-पुराणें यांची ओळख करून देण्याचा नाही. तर संस्कृत वाङ्मयांतून हा सर्व भाग वगळला असतां जो पद्यमय भाग शिल्लक राहतो त्याची ओळख करून देण्याचा आहे. तो भाग म्हणजे कालिदासपूर्व चारपांच शतकांपासून कालिदासोत्तर दहा बारा शतकांपर्यंत जे प्रमुख काव्यग्रंथ (पद्यमय) झाले त्यांचा होय. लोकशिक्षणाच्या लघुग्रंथमालेकरिता लिहावयाचें म्हणजे संस्कृत वाङ्मयापैकीं भागविशेष निवडून तेवढ्याचाच प्रपंच थाटणें, व तोहि त्रोटक रीतीने, आवश्यक होतें. ह्या मर्यादा संभाळून संस्कृत काव्यवाङ्मयाचें भावतें का होओीना · यथार्थदर्शन घडवावयाचें तर लाघवगौरवाचें तारतम्य · दक्षतेने संभाळावें लागतें. तसें तें प्रो. जोग यांच्या ग्रंथांत संभाळलें गेलें असल्याने पावणेदोनशें पानांच्या या आटोपशीर ग्रंथाच्या वाचनाने संस्कृत काव्यांपैकी अश्वघोष, कालिदास, भारवि, माघ, श्रीहर्ष, भट्टी यांचीं महाकाव्यें, कल्हणाची अैतिहासिक काव्यात्मक राजतरंगिणी, वारयोषितांचें वास्तववादी जीवनचित्र रेखाटणारें दामोदरगुप्ताचें कुट्टनीमत, क्षेमेंद्राचीं महाभारत, रामायण, बृहत्कथा अित्यादि ग्रंथांचे सारांश देणारीं दीर्घ काव्यें, तसेंच मेघदूत, गीतगोविंद, शतकत्रय, गंगालहरी, चौरपंचाशिका, चण्डी-शतकादि स्तोत्रें वगैरे लघुकाव्यें व त्याहिपेक्षा लघुतर अशीं सुभाषितें या सर्वांचा धावता चित्रपट येथे रसिकांस पाहावयास सांपडतो व तो पाहत असतां जोडीला · त्या त्या कवीची व कालाची जरूर ती चरित्रात्मक व ऐतिहासिक माहितीहि ऐकावयास मिळते. ग्रंथाची भाषा सुबोध असून मांडणी सुव्यवस्थित आहे. यामुळे संस्कृत काव्यवाङ्मयाचें अिसवी शकाच्या सुरवातीपासून सोळाव्या सतराव्या शतकापर्यंतच्या विविध रूपांचें दर्शन घडविण्याच्या दृष्टीने ग्रंथ उद्‌बोधक आहे.

या दर्शनाने मनावर एकंदर ठसा कोणता उमटतो? तो असा की हें काव्य विस्तार, अर्थगौरव, भावनोत्कटता, कल्पनाविलास, नादमधुर, शब्दरचना या सर्वांनी अत्यंत समृद्ध असें आहे. कालिदासाच्या काव्यांमध्ये या सर्व गुणांची अुत्कर्षसीमा पाहावयास सांपडते.

कालिदासोत्तर काव्यांत नादमाधुर्य, गायनानुकूलता व भावनोत्कटता या दृष्टीने गीतगोविंदाचें अेक स्वतंत्र स्थान आहे. पण रचनेच्या दृष्टीने अद्वितीय अशा या काव्यास 'गोपीपीनपयोधरमर्दना' च्या अुत्तान शृंगाराने मात्र लाज आणली आहे. अितर काव्यांतहि शृंगाराकडे वाढता ओढा आहे. सातव्या आठव्या शतकानंतरचा काळ हा भारतीय संस्कृतीला स्थिरावस्था येण्याचा काल होय. या स्थिरावस्थेचें प्रतिबिंब काव्यांत रचनेची क्लिष्टता, कृत्रिमता, तेच तेच विषय रंगविण्याची प्रवृत्ति व

रसोत्कटतेपेक्षा बौद्धिक करामतींची हौस या रूपानें पडलेलें दिसतें. अेकाच काव्याचा अेक अर्थ रामचरित्रपर तर दुसरा पांडवचरित्रपर, तर तिसरा यादवचरित्रपर अशीं काव्यें लिहिण्याची बौद्धिक करामत या काळात् आढळते. या करामतींत दिसून येणारें भाषेवरील प्रभुत्व दिपवून टाकणारें आहे, पण त्यांमुळे काव्यांत काठिण्य आणि कृत्रिमता हीं माजलीं आहेत. या कृत्रिमतेची व बौद्धिक करामतीची कल्पना 'काव्यचमत्कार' नांवाच्या अेका स्वतंत्र प्रकरणांत ग्रंथकारानें चांगल्या रीतीनें आणून दिली आहे. शेवटीं समारोप करितांना ग्रंथकार लिहितो की, 'संस्कृत काव्यसंपदेचें समीक्षण करतांना आधुनिक निकष लावणें हें अन्यायाचें होअील, पण तसें करण्याचा मोह मात्र आवरणार नाहीं. संस्कृत काव्यशास्त्राच्या निकषानेंहि या काव्यांतील क्लिष्टता, अवास्तवता, शृंगातिरेक, वर्णनाचा छापीवपणा, पाल्हाळ वगैरे त्या त्या स्थळीं दिसून येणारे दोष अुघड झाल्याविना राहत नाहीत. भावनाविष्कार अथवा रस याचा आत्मा म्हणून स्वीकार करण्यांत, प्रसादमाधुर्य, समता हे प्रमुख गुण मानून या गुणांपेक्षा अलंकाराचें स्थान दुय्यम ठरविण्यांत, व क्लिष्टता हा दोष म्हणून गणण्यांत संस्कृत साहित्यकारांची दृष्टि आजच्या साहित्यकारांच्या दृष्टीपेक्षा वेगळी नव्हती; पण काव्यशास्त्रांत हीं प्रमेयें प्रतिपादन केलीं जात असतां काव्यावर मात्र पांडित्याचें दडपण वाढतच गेलें. बहुतेक कवि दरबारी कवि असून आश्रयदात्याच्या वैभवाचें अतिशयोक्त अतअेव कृत्रिम वर्णन, त्याच्या विलासलोलुपतेला अुत्तेजित करणारा शृंगार व बुद्धिवैभवानें चकित करून सोडणारे श्लेषादि चमत्कार यांवरच भर देत. तथापि तत्कालीन युरोपियन काव्यापेक्षा तें कमी प्रकारचें नव्हतें. हें दर्शविण्याकरितां संस्कृत काव्यांतील गुणसंपदेचें वर्णन युरोपियन ग्रंथकार कसें करितात याचा मासला म्हणून प्रो. कीथ यांच्या ग्रंथांतील अुतारा दिला आहे. मला वाटतें की युरोपियन पंडितांनी केलेला गौरव अुद्धृत करण्याच्या अवस्थेच्या पलीकडे आपण आता गेलें पाहिजे. वधूबन्धूंनी स्वतः गौरव करावयाचा नसतो हें ग्रंथकाराचें म्हणणें मान्य. पण संस्कृत कविता ही मुग्धा वधू नसून आपल्या स्वतःच्या वैभवानें मिरविणारी प्रगल्भ प्रौढा आहे. तिची शिफारस करण्यास कीथची जरूरी नाही. युरोपियन ग्रंथकार संस्कृत वाङ्मयाच्या ज्या भागाला classical literature असें नांव देतात तोच मर्यादित भाग निवडण्यानेंहि संस्कृत काव्यसंपदेचें संपूर्ण दर्शन घडत नाही. या दृष्टीनें विशेष अुणीव भासते ती रामायणाच्या विषयी. त्याच्या दीर्घत्वामुळे त्याचा समावेश करण्यांत आला नाही असा खुलासा प्रारंभीं केला आहे, पण संस्कृत काव्य-वाङ्मयाच्या त्रोटक वृत्तांतांतहि ज्याचा प्रामुख्यानें अुल्लेख केला पाहिजे असें हें काव्य आहे. कालिदासादि अुत्तरकालीन कवींवर वाल्मीकीचें ऋण फार मोठें आहेच, पण कालदृष्ट्या जसें तें आद्य काव्य आहे, तसें कलादृष्ट्याहि आद्य पदवीवर हक्क सांगणारें आहे. या दृष्टीनें आद्य कवि वाल्मीकि याच्या काव्यापासून संस्कृत काव्यवाङ्मयाच्या अितिहासास प्रारंभ करणें अधिक अुचित झालें असतें. याच्याहि पूर्वीच्या वैदिक वाङ्मयांतील अुषेच्या सूक्तासारख्या सूक्तांचा 'संस्कृत काव्याचा अरुणोदय' या नात्यानें अुल्लेख करणें अनुचित होणार नाही. या प्राचीन काव्यामध्ये कृत्रिमतेचा अभाव असल्यानें केवळ अुत्तरकालीन वाङ्मयावरून कृत्रिमतेविषयी होणारा प्रतिकूल ग्रह शिथिल होण्यास मदत होअील व भारतीय संस्कृतीच्या अुतरत्या काळांत लिहिलेल्या काव्याच्या जोडीला तिच्या अुमारीच्या काळांत लिहिलेल्या काव्याचें दर्शन घडेल. तसेंच काव्याचा अितिहास येथे अभिप्रेत असल्यानें प्रमुख काव्यांतील वानगीदाखल दिलेल्या अुताऱ्याचें भाषान्तर वा सारांश सरस वठावा याविषयी अधिक मेहनत घेतल्यास अनाठायीं होणार नाही. या सूचनांचा पुढील आवृत्तींच्या वेळीं ग्रंथकार योग्य तो परामर्श घेतीलच. पण तोंवर आज आपणांपुढे असलेल्या पुस्तकानें संस्कृत काव्य-वाङ्मयाच्या अैतिहासिक समालोचनाची मराठींतील अुणीव आटोपशीरपणें पण समर्पक रीतीनें भागविली आहे असें म्हणण्यास प्रत्यवाय नाही. संस्कृत वाङ्मय हें आपलें पैतृक धन असल्यानें मराठी वाचकवर्गालाहि या आपल्या वंशपरंपरागत प्राप्त धनाची ओळख असणें अवश्य होय.

द. के. केळकर

**कथा:—**

**प्रस्थान (लघुकथासंग्रह)**— ले० वामन चोरघडे; प्रका० के. मि. ढवळे, मुंबअी.

श्री. वामन चोरघडे यांच्या या संग्रहावर मत व्यक्त करणें किंबहुना त्या वाचणेंहि थोडें अवघड होअून बसलें आहे. श्री. प्रभाकर पाध्ये आणि स्वतः चोरघडे या दोघांनी लिहिलेल्या प्रस्तावनांमुळे वाचक गांगरून जातो. त्या दोन्ही प्रस्तावनांतील गूढानुभववादी भाषा वाचून जो थोडाफार बोध होतो तो असा :— लेखक श्री. चोरघडे हे एक असे लेखक आहेत की त्यांची मूल्यें जगाला पटणें कठिण; तसेंच "सुजाण जीवनानुभवामुळे, अनुभवशील जीवनार्थशोधामुळे, जीवनाशीं आशयपूर्ण संगीत साधणारीं कथानकें आणि विषय तर ते निवडतातच, पण मानवी स्वभावाचे कांही विलक्षण नमुने ते लेखणीच्या चार दोन फटकाऱ्यांनी वाचकांपुढे अुभे करतात."

त्याचप्रमाणे ते आज अशा मनःस्थितींत आहेत की त्यांचें लेखन बंद तरी होईल, किंवा अधिक जोमाने तरी चालेल; ते कोठे तरी प्रस्थान करण्याच्या बेतांत आहेत वगैरे गोष्टींचा बोध स्वतः चोरघडे यांच्या "आरंभीं"च्या कथनावरून होतो. हे दोन स्नेही अशा आणीबाणीच्या मनः-स्थितींत असतां त्यांच्या लेखनासंबंधी कांही स्पष्टपणें लिहिणें म्हणजे खरोखर संकटच होय.

तथापि या दोघांच्या गुपिताबाहेर असणाऱ्या वाचकांस या पुस्तकांत काय आढळेल हें सांगणें प्राप्त आहे. चोरघड्यांचीं मूल्यें अगदीच एकटीं आणि पोरकीं पडतील असें वाटण्याचें कारण नाही. यंत्रबद्ध आणि सुखवादी अशा आधुनिक जीवनाविरुद्ध त्यांनी अनेक ठिकाणीं आरोळी देण्याचा यत्न केला आहे. ही हाकाटी आज वाङ्मयांत अपवादात्मक तर नाहीच, पण जवळ जवळ फॅशन् ठरण्या-अितकी चिरपरिचित आहे. अर्थात् तीच गोष्ट फिरून मनःपूर्वक केल्यास ती नवीनच होय असें मान-णारांपैकी प्रस्तुत लेखक आहे. पण या बहुतांशीं मानववादी आणि गांधीवादी मूल्यामुळे चोरघडे अेकटे पडण्याचें कारण आहेसें वाटत नाही. अुलट आजच्या त्यांच्या लोकप्रियतेचें मूळ म्हणजे हें प्रचलित लोकप्रिय तत्त्वज्ञान कवटाळणें हेंच असूं शकेल.

लेखनपद्धतीच्या बाबतींतहि अशाच कित्येक गोष्टी सहज लक्षांत येतील. भाषेंत अिंग्रजी व हिंदी वळणाची भेसळ; प्रातिक शब्दांची आणि वाक्प्रचारांची जाणूनबुजून पेरणी; गद्यकाव्यांत अपक्व लेखक ज्या तऱ्हा योजतात त्यांचा अवलंब वगैरे गोष्टींचा या प्रकारांतच समावेश होतो. प्रस्तावना-लेखकांनी या प्रकारांचा निर्देश केला आहे. पण हे सर्व प्रकार लेखकाच्या मनांतील अविरत वाट म्हणून अपरिहार्य होत असें त्यांचें म्हणणें दिसतें. तर हल्ली अनेक लेखक याच प्रकारांचा, म्हणजे मध्येच वाक्य सोडणें, फुल्या घालून कथन तोडणें, लघुकथेंतून लघुनिबंधांत अुडी घालणें, दोन दोन प्रश्नचिन्हें एकापुढे एक जोडणें !— अुपयोग सर्रास करीत असतात हें पाहतां त्यैा सर्वांस कांही अनिर्वचनीय गूढानुभव व्यक्त करावयाचे आहेत असें म्हणतां येत नाही. निदान दुहेरी प्रश्नचिन्ह हा प्रकार तरी सर्वथा अश्रुत आणि असंमत होय !

जाणून वा अजाणतां केलेले 'अ-मराठी' प्रयोग सोडले तरी व्याकरणाचेहि हाल लेखकानें बरेच केले आहेत. लेखक सुविद्य, सुबुद्ध अगर सराअीत नाही असें नाही. तरी हल्ली विचार आणि अुद्गार या दोहोंतहि कांही तरी अजब करण्याची प्रवृत्ति इतकी वाढली आहे की त्या भरांत व्याक-रणदोषहि लोक पत्करीत असावे. चोरघडे प्रास्ताविक भागांत लिहितात: "ह्या अुद्देशाने ह्यांत कांही गोष्टी थोड्या कमी प्रतीच्या झाल्या असतील, तर वाचकांनी क्षमा करावी कारण त्यांपैकी **कांहींना लिहिल्यास** तर अेक तपावर अवधि लोटला आहे.' हा प्रयोग "**मी पत्राला लिहिलें**" या-सारखा मिशनरी वळणाचा झाला आहे. 'कारटें' हा शब्द मराठींत तिरस्कारव्यंजक आहे; लेखकाने तो "बिचारें पोर" अशा अर्थी प्रेमळपणे वापरला आहे ! "**जिजा माझी नी माझी**" होती; असा प्रयोग मराठींत पाहण्यांत नाही. (हिंदींत वाचल्याचें स्मरेल.) तसेंच "याच आशेने अेक कल्पना

आपल्यापुढे मांडण्याची घृति झाली आहे." यांतील 'घृति' शब्दाचा अुपयोग 'कालेलकरी' अेतअेव 'अमराठी' आहे.

असे अनेक प्रयोग दाखवितां येतील. चांगले लेखकहि अनवधानाने भाषादोष करतात. पण प्रस्तुत पुस्तकांतील दोष अनवधानाचे नसून कांहीतरी 'अपूर्व' लिहिण्याच्या धडपडींतून निघाले आहेत. अेके ठिकाणीं तर लेखकाने सरळ गद्य असून चरणरेघा आणि पद्यसंख्यांचे आंकडे टाकले आहेत ! मराठी शब्दकोश, वाक्प्रचार, वाक्यप्रयोग, गद्यसरणी वगैरे सर्वच अपुरे पडण्याअितका विशाळ आशय या संग्रहांत आहे असें श्री. पाध्ये यांच्याप्रमाणे कोणाचें मत झाल्यास गोष्ट वेगळी; अेरव्ही भाषेवरील हे अत्याचार चिन्तास्पद होत.

या सर्व दोषांची जबाबदारी केवळ चोरघडे यांजवर नाही. हिंदी-बंगालींतील शब्द व रचना मराठीच्या प्रकृतीशीं विसंगत असूनहि अुचलणें व अशा प्रकारें विचित्र आणि वेगळी भाषा लिहून प्रसिद्ध होणें ही प्रवृत्ति मराठींत अनेक लोकांनी दाखविली आहे.

रा. चोरघडे यांस जशा प्रकारचे अनुभव व्यक्त करावयाचे आहेत तशा प्रकारचे अनुभव चांगल्या लेखकांनी कितीतरी सुबोधपणें व्यक्त केले आहेत. अुलट, अनुभव अुत्कट नसले तरच भाषेचे हाल अधिक करण्याची प्रवृत्ति दिसते. प्रस्तावनेंत पान १५ वर श्री. पाध्ये चोरघड्यांच्या कथांचा जो विशेष आशय म्हणून सांगतात तो सर्वच चांगल्या कथांचा आशय असतो. पाध्यांनी वर्णिलेलें स्वरूप रवींद्र आणि शरच्चंद्र यांच्या कथांच्या स्वरूपाशीं अधिक जुळतें. पण तेहि बिचारे गद्यसरणी आणि कथारूप वाङ्मयप्रकार यांचे अितके हाल करीत नाहीत. याचें कारण त्यांचा आशय अितका जिवंत असतो की त्यांतून वाङ्मयप्रकार ( form ) जणू जिवंत तरूच्या शाखापल्लवांप्रमाणे वाढतो. प्रस्तुत संग्रहांतीलच अुदाहरण द्यायचें तर झकीर हुसेन यांच्या भाषांतरित लघुकथेंतील संदेश— हिंमत आणि लढा यांतील वैभव-कथेच्या रूपाने प्रतीत करून देण्यांत झकीर हुसेन यांस अुत्तम यश आलें आहे. त्या कथेंत अवडंबर नसून स्पष्टता आहे.

लेखकांच्या कांही गोष्टींत अिंद्रियगम्य अनुभव चाखण्याची आणि चितारण्याची हातोटी चांगली प्रत्ययास येते. या दृष्टीने 'सौंदर्याचें सुख' ही गोष्ट विशेष परिणामकारक आहे. लेखक भाषेच्या अवडंबरापेक्षा अनुभवाला अधिक महत्त्व देअील, तर त्यांचें लिखाण अधिक जिवंत होअील. ज्यांना जिवंत कलेचें सामर्थ्य ठाअुक आहे ते श्री. पाध्ये यांनी प्रस्तावनेंत अुभ्या केलेल्या बागुलबोवाकडे पाहून फक्त हंसतील. महात्मा गांधींचें काव्यमय गद्य, रवींद्र आणि शरच्चंद्र यांचें प्रभावी कथावाङ्मय यांहूनहि कांही नवीन आणि गूढ चोरघडे यांस सांगावयाचें आहे असें तर पाध्ये यांचें मत नाही ! आणि कोणतेंहि गूढ सत्य मूर्त आणि सुंदर करणें हें तर कलेचें कार्य. अुलट सामान्य आणि सुपरिचित सत्यें दुर्बोध करणें म्हणजे श्रेष्ठ कला असा कित्येकजण अर्थ करीत आहेत. श्री. चोरघडे यांनी शब्दावडंबर आणि कांही तरी अद्भुत सांपडलें आहे हा भ्रम सोडल्यास त्यांच्या हातून सत्य, साहित्य आणि समाज यांची मातबर कामगिरी होअील.

श्री. के. क्षीरसागर

**नव-लेखन**— संचालक किनारीवाला, दवे, साक्रीकर; प्रका० शं. वा. कुलकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ-भाण्डार, मुंबअी.

सदरहू पुस्तकाचें स्वरूप प्रथमदर्शनीं लक्षांत येत नाही. अेखाद्या मासिक पुस्तकांत जसें अनेकांचें लिखाण अेकत्र केलेलें असतें, तसें यांत काळे, कुसुमाग्रज, पोवळे अि. कवींच्या कविता, माधव मनोहर, पाध्ये, केशवराव दाते यांचें गद्य लिखाण अेकत्र छापण्यांत आलें आहे.

अेखाद्या साहित्यमंडळाने अनेकांच्या लेखनाचा अेकत्र संग्रह छापावा तशी कांहीशी ही कल्पना वाटते. तथापि पुस्तक, मासिक आणि वेंचे यांच्या दरम्यान पडणाऱ्या या पुस्तकावरून प्रकाशनाचा नक्की अुद्देश ध्यानीं येत नाही. चालकांत अितर प्रांतांतीलहि लोक आहेत.

पुढील प्रकाशनें बाहेर पडेपर्यंत या अुद्योगाचें नीटसें रूप स्पष्ट होणार नाही. लेखनसाहाय्य करणारी बहुतेक मंडळी वाचकांस सुपरिचित आहेत या दृष्टीने पुस्तक वाचनीय तर आहेच. शास्त्रीकर आणि माधव मनोहर यांच्यासारखे नवीन विचारांचे साहित्यिक चालकवर्गात असल्याने मराठी वाचकवर्ग या प्रयत्नाकडे कुतूहलाने पाहत राहील.

अितर भाषांतूनहि– अिंग्रजी, गुजरार्थीतूनहि– पुस्तकें प्रकाशित करण्याचा प्रकाशकांचा विचार आहे. हें प्रान्ताप्रान्तांचें सहकार्य आम्ही विशेष महत्त्वाचें मानतों. श्री. के. क्षीरसागर

सुवर्णतुलाः– ले० प्रो. श्रीकृष्ण केशव क्षीरसागर, बी.ए.; प्रका० पद्म प्रकाशन लिमिटेड, मुंबई; मूल्य तीन रुपये.

या लहानशा पुस्तकांत प्रो. क्षीरसागर यांनी "कांही विख्यात भारतीयांच्या व्यक्तिमत्त्वाचे व कार्यांचे आपले ' अभ्यास ' ( Studies ) " महाराष्ट्रीय वाचकांपुढे ठेविले आहेत. आणि हे सर्वच ' विभूतिसमीक्षणात्मक अभ्यास ' अत्यंत वाचनीय असे अुतरले आहेत यांत शंका नाही. ( ' व्यक्तिपरीक्षणात्मक अभ्यास ' ही संज्ञा क्षीरसागरांनी ' Studies in *Personality* ' या इंग्रजी अर्थाने वापरली आहे हें उघड आहे. याच अभिप्रेत अर्थी त्या संज्ञेतील 'व्यक्ति' (Individuality, Individual ) या शब्दांऐवजी ' विभूति ' (Personality) हा शब्द व ' परीक्षण ' (Examination) या शब्दाऐवजी ' समीक्षण ' (Estimation) हा शब्द मी सुचवितों. ) हे विख्यात भारतीय म्हणजे गांधी, राधाकृष्णन्, जवाहरलाल, न्यायमूर्ति रानडे, रॉय, रवीन्द्रनाथ ह्या सहा विभूति होत; व क्षीरसागरांनी आपल्या या पुस्तकांत या विभूति व त्यांचें कार्य यांजविषयी दिलेल्या क्रमाने विवेचक समीक्षणें लिहिली असून शेवटी ' व्यक्तिपरीक्षण–राष्ट्रीय समालोचन ' ( म्हणजेच 'विभूतिसमीक्षण' राष्ट्रीय समालोचन ) हा अत्यंत सूचक निबंधहि त्यांनी जोडला आहे.

या शेवटच्या निबंधांत ( जो निबंध आरंभींच छापावयास पाहिजे होता असें वाटतें ) लेखकाने महाराष्ट्रेतिहासांत राष्ट्रीय विभूतिपूजनाचे जे जे विषय होअून गेले त्यांवरून विभूतिसमीक्षणाच्या मूल्यांचा महाराष्ट्रांत कसकसा विकास होत गेला याचें मोठें सूचक विवेचन केलें आहे. अर्थात् राष्ट्रीय विभूतिपूजन कसकसें होत गेलें याबरोबरच अलीकडील काळांत तरी तें कसकसें व्हावयास हवें होतें याचाहि परामर्श लेखकाने मोठ्या साक्षेपाने घेतला आहे. ' केतकरांचें आकलन व अनुकरण ' महाराष्ट्रांत व्हावें तसें झालें नाही अशी क्षीरसागरांची तक्रार आहे, व ती अंशतः खरीहि आहे. परंतु क्षीरसागरांनी आपल्या विवेचनांत केतकरांचें भावरूप (Positive) विभूतिवैशिष्ट्य थोडें-तरी उल्लेखावयास पाहिजे होते असें वाटतें. ' कोशयुगप्रवर्तक ' हें त्यांचें इतरांनी केलेलें मापन तोकडें, तर स्वतः क्षीरसागरांचें केतकरमापन चारदोन ओळींत तरी (त्यांनी तें इतरत्र सविस्तर केलेलें असलें तरी ) या निबंधांत त्यांच्या पूर्णतेसाठी यावयास हवें होतें. केतकरांच्या महाराष्ट्राने केलेल्या उपेक्षेबद्दल क्षीरसागर रागावतात व हळहळतात, व या त्यांच्या भावनांशीं मीहि सहानुभवी आहें, परंतु वस्तुस्थिति अशी आहे की महाराष्ट्रांत राष्ट्रीय विभूतिमत्त्व धारण करणारे पुरुष टिळकांनंतर बहुशः विरळाच झाले ! ( ' बहुशः ' म्हणण्याचें कारण सावरकर हे या विधानास कांहीतरी अपवाद दिसतात ) आणि क्षीरसागरांचे 'महाराष्ट्रांतील सर्वार्थाने आधुनिक महापुरुष म्हणजे डॉ. केतकर' हेहि त्यांची जागा घेअूं शकले नाहीत ! राष्ट्रीय जीवनांत मतभेदातीत व निःसंदिग्ध रीतीने पूजाविषय होण्यास केवळ क्रांतिकारक विचारक (Thinker) असून भागत नाही, तर त्या विचारकाच्या अंगी संग्राहक लोकनेतेपणाचेहि गुण असावे लागतात. असा पुरुष टिळकोत्तर युगांत महाराष्ट्रांत झाला नाही. विविध राष्ट्रीय लोककार्यें चालू होतें व आहे; पण कार्यकर्ते सर्वच दुय्यम-तिय्यम दर्जाच्या विभूति असल्यामुळे सर्वांगीण राष्ट्रीय जीवनाचें प्रातिनिधिक प्रतीक अशी पूजनीय विभूति त्यांत कोणीहि झाली नाही.

क्षीरसागरांच्या वैयक्तिक विभूतिसमीक्षणात्मक अभ्यासांच्या पुस्तकांत दिलेल्या क्रमांत कोणतेंहि विशिष्ट तत्त्व दिसत नाही. कालानुक्रमाने हे अभ्यास लाविले असते तर बरें होतें असें वाटतें.

म. सा. प. (१८-४-६)

'गांधी व गांधीवाद' हा पहिला अभ्यास जसा लांबीने सर्वांत विस्तृत आहे, तसाच तो विषयाबद्दलच्या अत्यंत विस्तृत सहानुभूतीने– किंबहुना (क्षम्य) पक्षपाताने लिहिलेला आहे. गांधींच्या विभूतिमत्त्वाचे व कार्याचे वेगवेगळे पैलू त्यांत मोठ्या कुशलतेने व यथार्थतेने दाखविले आहेत. गांधींच्या टीकाकारांचा अुल्लेख करतांना मात्र थोडा अनौदार्याचा दोष लेखकाच्या हातून घडलेला आहे असें वाटतें (पाहा– पृ. १६, पृ. १९ अित्यादि). —'आचार्य राधाकृष्णन्' हा दुसरा अभ्यास चांगला असला तरी अपुरासा वाटतो. राधाकृष्णांचें राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय विभूतिमत्त्व त्यांत पूर्णपणें प्रतीत होत नाही. त्यांच्या सर्व ग्रंथांचीहि त्यांत दखल घेतली नाही, व राधाकृष्णांचें विभूतिमत्त्व, त्यांच्या मोठमोठ्या ग्रंथापेक्षाहि लहान लहान पुस्तकांत व निबंधां-व्याख्यानांतच जास्त प्रतीत होत असतें. —'पं. जवाहरलाल नेहरू' हा तिसरा अभ्यास मुख्यतः त्यांच्या अिंग्रजी 'आत्मचरित्रा'चें समीक्षण आहे— विशेषतः या आत्मचरित्रांत प्रतीत होणाऱ्या नेहरूंच्या विभूतिमत्त्वाचें समीक्षण आहे, आणि तें अत्यंत मर्मग्राही आहे.— परंतु 'न्यायमूर्ति रानडे' हा चवथा अभ्यास या पुस्तकांतील सर्वच चांगल्या अभ्यासांतील सर्वांत चांगला—अुत्कृष्ट अभ्यास होय. रानड्यांच्या आध्यात्मिक विभूतिमत्त्वाची घडण व तिचा त्यांच्या विविध क्षेत्रांतील कार्यावर व कार्यपद्धतीवर सहजच झालेला परिणाम यांचें अितकें सूक्ष्म, मूलग्राही व विकलक (Analytical) मानसशास्त्रीय विवेचन अितरत्र कोठे वाचण्यांत नाही.—'कॉम्रेड रॉय' हा पांचवा अभ्यास सर्वांत अपूर्ण भासला. त्यांत रॉय यांच्या विभूतिमत्त्वाचें थोडेंसें वर्णन व त्यांच्या अेका अैतिहासिक प्रबंधांतील विचारसरणीचें विवेचक खंडन हीं अंगें आलीं असलीं तरी 'रॉयवाद' म्हणून ज्या त्यांच्या तत्त्वज्ञानाचा अुल्लेख होतो त्याचें थोडेंसें विवरण या अभ्यासांत अवश्य यावयास हवें होतें तें आलेलें नाही.—'रवीन्द्रनाथ' या सहाव्या व शेवटच्या अभ्यासांत या कवीचें श्रेष्ठत्व त्याच्या शांतता व सौंदर्य यांच्या शोधांत आहे हें जसें विशद केलेलें आहे, तसेंच त्यांच्या एकंदर जीवनतत्त्वज्ञानांत आवश्यक त्या युयुत्सुत्वाचा अभाव ही मोठीच अुणीव असल्याचेंहि बिनचूक निदान केलें आहे.

याप्रमाणे हे सर्वच अभ्यास लेखकाच्या स्वतंत्र व मौलिक, विकलक व विवेचक, आणि सिद्धांती बुद्धीचे निदर्शक आहेत. प्रो. क्षीरसागर यांनी साहित्याचे संशोधक समीक्षक म्हणून स्वतःस वेगळें असें स्थान महाराष्ट्रसाहित्यांत मिळविलें आहे. मर्मग्राही विभूतिसमीक्षक म्हणून या ग्रंथांत त्यांच्या बुद्धीचा आणखी अेक वेगळा पैलू वाचकांस अुपलब्ध झाला आहे व वाचकांस त्याबद्दल आनंदच होअील यांत शंका नाही.

ग्रंथाचें नांव 'सुवर्णतुला' असें ठेविलें आहे. त्याचा अर्थ स्पष्ट करण्याचा प्रयत्न लेखकाने प्रस्तावनेंत केला असूनहि तो तसा स्पष्ट अथवा सुसंगत होत नाही. पूर्वी राजे लोक आपली सुवर्ण-तुला करून घेत, त्याप्रमाणे जीवनाच्या विविध क्षेत्रांतील अनभिषिक्त राजांची सुवर्ण-तुला या ग्रंथांत केलीं आहे—हा स्वतः कर्त्याचा अभिप्रेत अर्थ. परंतु पूर्वीची सुवर्णतुला म्हणजे माणसाच्या भारंभार सोनें काढून ठेवणें होय. प्रस्तुत ग्रंथांतील विभूतिसमीक्षणाचे लेख (ते चांगले असले तरी) असें भारंभार काढून ठेवलेलें सोनें आहे असें कर्त्यास तरी म्हणावयाचें असेल असें वाटत नाही. 'सुवर्णतुला' म्हणजे सुवर्ण तोलणें नव्हे, तर सुवर्णानें तोलणें. आणि स्वतः लेखक 'माझ्या ग्रंथांत मीं कांही विभूतींची माझ्या लेखरूपी सुवर्णाने तुला केली आहे' असें कसें म्हणेल ?— शिवाय, ग्रंथनामांत 'तुले'ची (तोलण्याची) कल्पना आहे, तर ग्रंथाच्या आवरणावर सुवर्णाच्या रासायनिक 'अग्निदिव्या'चा संशुद्धिप्रयोग चित्रित केला आहे. हा कल्पनासंकर होय. यापेक्षा 'सुवर्णनिकष', 'सुवर्णसमीक्षा' वा 'सुवर्णशोधन' असें अेखादें नांव ग्रंथास दिलें असतें तर तें अधिक अन्वर्थक झालें असतें असें वाटतें.

पुस्तकाची छपाअी व बहिरंग ठीक आहेत, परंतु मुद्रणदोष बरेच राहून गेले आहेत.

दे. द. वाडेकर

विविधः—

**मुंग्यांचें वारूळः—** ले० बाबुलनाथ; आर्यसंस्कृतिप्रकाशन, पुणें; किं. २ रु.

यांतील पांचसहा कविता सोडल्यास हा अेक विनोदी आणि विडंबनपर कवितांचा संग्रह आहे. बाबुलनाथ यांनी याआधीं आकाशगंगा आणि जलधारा असे दोन संग्रह प्रसिद्ध केले आहेत व आणखीहि अेक संग्रह प्रकाशित करणार असल्याची सूचना त्यांनी देअून ठेविली आहे. विडंबनें आणि विनोदी कविता यांचा संप्रदाय सुरू झाल्यास वीस वर्षें झालीं आहेत. प्रथा नवीन असतांना तिचें विशेष कौतुक होतें. तसें कौतुक करण्याचा काल आता संपला असून परीक्षणाचा काल आला आहे असें म्हणावयास हवें. म्हणून विनोद-विडंबनांचा दर्जा अुच्च असावा अशी वाचकांनी अपेक्षा करण्यालाहि हरकत अुरलेली नाहीं. प्रस्तुत संग्रहांतील अशा कवितांचा दर्जा विशेष अुच्च नाही; पण त्याचा दोष कवीपेक्षा अशा कवितांचें कौतुक करणाऱ्या सर्वसामान्य वाचकांचा आणि श्रोत्यांचा आहे असें म्हणावयास हवें. ज्या प्रकारचा विनोद खासगी संवादांतहि श्लील मानला जाणार नाही, असा विनोद नियतकालिकांतून येतो व तेथे अेकदा आल्यावर त्याला आधिक चिरस्थाअी स्वरूप दिलें जातें. अुदाहरणार्थ, यांतील दोन बायकांचा खाजगी संवाद पाहावा. अनेक दिवसांनी भेटलेल्या आपल्या सखीस पाहून "आपलें गुपित कसें कळविलें नाहीस, बर्फी किंवा पेढे केव्हा देणार" अशी पृच्छा दुसरी अेक तरुणी करिते. तिला पहिली अुत्तर करिते "मी नसुनि गरोदर, पोट पुढे तें आलें। जाहला जलोदर, डॉक्टरनी सांगितलें." या विनोदाची पदवी काय आहे हें विशद करून सांगाव-यास पाहिजे असें नाहीं. साऱ्याच कवितांत विनोदाचा हा तळ गांठला आहे असें नाहीं; तथापि प्रौढ अभिरुचीला आल्हाद होअील अशा प्रकारचा विनोद कोठे आहे असें दिसलें नाहीं हेंहि तितकेंच खरें. विनोदी कवितांत भाषा किंवा पद्यरचना यांच्या शुद्धतेकडे लक्ष न दिलें तरी चालतें, किंबहुना तोहि विनोदाचाच अेक भाग आहे, अशी अेक गैरसमजूत विनोदी म्हणून कविता लिहि-णारांमध्ये प्रचलित दिसते. तिच्यामधून प्रस्तुत कवीचीहि सर्वस्वीं सुटका झाली नसल्याचें दिसतें. पुढील श्लोक पाहावा—'अुन्ह्यावरी हा कुठे देवळांच्या। दृष्टोत्पत्तीला पडे भाविकांच्या। अचूक तेव्हा मनीं हेंच येअी। 'हा लाभ झाला कसा प्राप्त होअी'॥ अित्यादि. दुसऱ्या अेका कवितेमध्ये 'मज सांग सांग बाळा। आहेस तूंच कोठे' या ओळींतील 'च' कशाकरिता आला आहे तें स्पष्ट आहे. हृदयाचें पाणी होतें असें म्हणावयाच्या अैवजी 'अंतराचें जल होतें' असें कवि लिहितो. ही कविता विनोदी नाही असें 'मातृविलाप' या तिच्या नांवावरून व तीमधील अितर रचनेवरून दिसतें. नाहीं-तर हाहि कांहीं विनोद तर नव्हे अशी शंका येती. केवळ विनोदाकरिता सर्कशींत काम करणाऱ्या विदूषकांनाहि किमान तांत्रिक कौशल्य हस्तगत करावें लागतें. 'अश्लीलमार्तंड' या नांवाची अेक कविता या संग्रहांत आहे. ती कोणास अुद्देशून आहे हें कोणाला कदाचित् कळणार नाही असें वाटून कवीने कवितेच्या प्रारंभास श्री. मराठे यांची माफी मागितली आहे. मराठ्यांची थट्टा करणें जेवढें सोपें आहे, त्यापेक्षा आपल्या विनोदाची पदवी अुच्च राखणें ही गोष्ट अधिक कठिण आहे ही गोष्ट कवीच्या लक्षांत आलेली नाही. प्रस्तुत संग्रहांत विनोदी नाहीत अशा ज्या कविता आहेत, त्याच बऱ्या अुतरल्या आहेत. पण बाकीच्या विनोदी म्हणून सहेतुक लिहिल्या गेलेल्या कवितांना 'आर्य-संस्कृति प्रकाशना'ने चिरस्थायित्व देण्याजोग्या त्या नाहीत. कालोदरांत सर्व संग्रहच मुळीं चिरस्थायी राहणार नाही ही अेक समाधानाची बाब आहे हा भाग निराळा. रा. श्री. जोग

**नवीन हिंदु कायद्याचें समाजशास्त्रदृष्ट्या परीक्षणः—** ले० अिरावती कर्वे.

या कायद्याचा पुरस्कार करणाऱ्या अेका पुस्तिकेचा परिचय याच अंकांत अितरत्र आलेला आहे. ही दुसरी पुस्तिका त्या संकल्पित कायद्यामध्ये असणाऱ्या कांहीं दोषांचें दिग्दर्शन करण्यासाठी लिहिली आहे. असे कायदे समाजशास्त्रीय दृष्टीने केले गेले पाहिजेत, श्रुतिवाक्यांच्या शब्दप्रामाण्याने नव्हे, हें तत्त्व अुपरिनिर्दिष्ट पुस्तिकेच्या परीक्षणांत श्री. ना. गो. चापेकर यांनी सूचित केलेंच आहे. त्या

समाजशास्त्राची दृष्टि लावूनहि प्रस्तुत संकल्पित कायद्यामध्ये अुत्पन्न होणाऱ्या दोषांची चर्चा लेखिकेने या पुस्तिकेंत केली आहे. कायद्याने पुरुषावर अेकपत्नीत्वाचा निर्बंध घालूं नये असें स्पष्ट मत लेखिकेने दिलें आहे. तसेंच वधूवरांवर वर्णाचे व गोत्रप्रवरांचे घातलेले निर्बंधहि लेखिकेस अमान्य दिसतात. पटत नसलेल्या पतिपत्नींच्या बाबत लग्नविच्छेदाची सोय असणें आवश्यक असून त्याची बजावणी मात्र निराळ्या पद्धतीने व्हावयास हवी असें तिने प्रतिपादिलें आहे. याप्रमाणेच वारसा, दत्तक अित्यादि अधिकारांसंबंधींहि लेखिकेला कांहीं सुधारणा अिष्ट वाटतात. हिंदुसमाजासारख्या अत्यंत संमिश्र समाजांत निरनिराळ्या जमातींचें अेकीकरण अनेक शतकें चालू आहे. अशा समाजास सरसकट अेकच कायदा लावणें, हें त्यांतील कांहीं जमातींस, निदान व्यक्तींस, अन्यायाचें होणार आहे. कित्येक जमातींमध्ये रूढ असणाऱ्या चालीरीतींच्या अिष्टतेची मीमांसा संशोधनाने व्हावयास हवी असें लेखिकेचें आग्रहाचें म्हणणें आहे, व अशा संशोधनानंतरहि असें आढळून येण्याचा संभव आहे कीं कोणती चाल अिष्ट आहे व कोणती अनिष्ट आहे हें ठरविणें अशक्य आहे. दोन्हीहि तुल्यमूल्य असूं शकतील. अशा दोन्ही रूढि चालूं देणें अनिष्ट समजण्यापेक्षा समाजास आवश्यक तो लवचिकपणा यामुळे येअील असेंहि त्यांचें मत आहे. लेखिकेचा समाजशास्त्राचा व्यासंग प्रसिद्धच आहे. तिने समाजशास्त्रदृष्ट्या केलेलें संकल्पित हिंदुकोडाचें हें परीक्षण विचारप्रवर्तक आहे. संकल्पित हिंदु कायद्याचा विचार सध्याच्या राजकारणाच्या धुमाळींत सुशिक्षित जाणते लोकसुद्धा करीत नाहीत असें दिसतें. कित्येक त्यास विचार न करतांच विरोध करीत आहेत, तर कित्येक, विशेषतः स्त्रिया, त्यांतील अेकपत्नीत्वाच्या योजनेचा आग्रह विचारापेक्षा भावनेनेच अधिक धरीत आहेत. अशा वेळीं प्रस्तुत पुस्तिकेच्या लेखिकेने केलेल्या या परीक्षणाचा परामर्श सर्व शिक्षित स्त्री-पुरुषांनी अवश्य घ्यावयास हवा. तो घेणें सुलभ व्हावें अितक्या सुबोध भाषेंत व स्पष्ट विचारसरणीचा आश्रय करून ती पुस्तिका लिहिली गेली आहे यांत शंका नाही.

रा. श्री. जोग

**मराठी कवितेचें अध्यापन**— ले० प्रा. म. वि. फाटक, कर्नाटक कॉलेज, धारवाड; प्रका० मॉडर्न बुक डेपो, पुणें २; मूल्य रु. १॥.

प्रा. म. वि. फाटक यांनी हें पुस्तक लिहून अध्यापनपद्धतीवरील मराठी ग्रंथांत चांगली भर घातली आहे. मराठी विषयाच्या अध्यापनाविषयी, विशेषतः दुय्यम शाळांतील अध्यापनाच्या दृष्टीने, प्रा. ना. वि. पाटणकर व अकोलकर यांनी ' मराठीचें अध्यापन ' हें पुस्तक लिहिलें आहे. त्यानंतर हें दुसरें पुस्तक होय. यावरून या विभागांत असले ग्रंथ किती थोडे आहेत याची कल्पना येते. प्रा. फाटक यांनी हें पुस्तक लिहितांना स्वतः ' टिळक कॉलेज ऑफ एज्युकेशन ' या संस्थेंत अध्यापन-मार्गदर्शक म्हणून आलेल्या अनुभवाचा भरपूर उपयोग केला आहे. ठिकठिकाणीं दिलेलीं उदाहरणें हा या पुस्तकाचा विशेष आहे. कवितेच्या अध्यापनासंबंधींच्या चुकीच्या कल्पनांचा आणि पद्धतीचा त्यांनी विस्ताराने अूहापोह केला आहे. त्याबरोबरच त्या बाबतींत आपल्या मताप्रमाणे बरोबर कोणतें तेंहि विस्तृतपणें सांगितलें आहे.

काव्यांतील कलात्मक सौंदर्याचें आविष्करण हा काव्याच्या अध्यापनाचा हेतु आहे असा प्रा. फाटक यांच्या मताचा सारांश सांगतां येईल. नीतिबोध, शब्दसंपत्तीची वाढ इत्यादि हेतूंवर त्यांनी प्रखर टीका केली आहे. ती टीका पुस्तकाच्या विस्ताराच्या मर्यादेंत कांहींशी त्रुटित झाली आहे. सौंदर्याचा आविष्कार होत असतांहि नैतिक भावनांचाहि परिपोष साधतां येतो हा या विवेचनाचा भाग तितकासा स्पष्ट झालेला नाही. नीतिपंथास विरोध करतांना सौंदर्यवादी टीकाकार त्या पंथांतील फक्त चुकीच्या मतांवरच हल्ला करतात. परंतु सौंदर्यानुभव आणि नैतिक विकास हीं एकरूप होण्याची जी अेक पायरी आहे तिचा विचार प्रा. फाटक यांनी जास्त विस्ताराने करणें जरूर होतें.

काव्याच्या शिक्षकाने स्वतः समरस झालें पाहिजे. समरस होण्याची पात्रता ही त्याची मुख्य लायकी. अध्यापनास आरंभ अेकदम काव्यवाचनापासून करावा. वाचन (गायन नव्हे!) करीत असतांनाच विद्यार्थ्यांच्या मनांत काव्यांतील रसास्वादास अनुकूल असें वातावरण अुत्पन्न होणें हीच वाचनाची कसोटी. यापूर्वी अध्यापनासाठी कवितांची निवड करतांना विद्यार्थ्यांची अनुभव घेण्याची पात्रता किंवा वयोमर्यादा हाहि विचार महत्त्वाचा आहे हें प्रा. फाटक यांनी सांगितलें आहे. या बाबतींत लहान मुलांना 'मधु-घटा'कडे नेणें किंवा 'जगरहाटी' शिकविणें हें कसें अप्रस्तुत आहे हें त्यांनी दाखविलें आहे. आपल्या प्रसिद्ध क्रमिक पुस्तकांची या दृष्टीने फेरतपासणी करण्याची वेळ आता आली आहे असें अनेक शिक्षकांना अनुभवाने वाटूं लागलें आहे. पुस्तकाच्या अुत्तरार्धांतील विवेचन या दृष्टीने शिक्षकांस फारच अुपयुक्त वाटेल.

ग्रंथलेखनास त्यांना कांही प्रसिद्ध अिंग्रजी ग्रंथकारांवरून स्फूर्ति झाली असल्याचें ते सांगतात. प्रत्यक्ष लेखनांत त्यांनी त्या स्फूर्तीचा योग्य परिपोष केलेला दिसतो. अनेक वादग्रस्त मुद्दे आणि मूलभूत विचार केवळ ७५ पानांत आटोपतांना लेखकाची कुचंबणा होणें अपरिहार्य होतें!

गं. भा. निरंतर

---

## संपादकीय

१९४५ च्या शेवटल्या तिमाहीच्या या अंकास फार उशीर झाला आहे याची जाणीव आम्हांस आहे. परंतु छापखान्यांतील अडचणींमुळे निरुपाय झाल्यानेच हा उशीर झाला आहे ही गोष्ट कळल्यावर आमचे वाचक क्षमा करतील अशी आशा आम्हांस वाटते. आतापर्यंत कागदाची अडचण विशेष भासे, त्याअेवजीं आता मुद्रणाविषयीच अडचणी अधिक येअूं लागल्या आहेत. सरकारी निवडणुकीच्या यादयांबाबत बरेंच काम अग्रशतेने करावें लागणें; दुसऱ्या छापखान्यांतूनहि बाहेरचीं कामें घेतलीं न जाणें, व मूळ छापखान्यांतील कामगारच फार कमी होणें इत्यादि अनेक कारणांनी हा उशीर झाला आहे. अितकें सांगितल्यावर अधिक कांही सांगण्याची गरज सुज्ञ वाचकांना तरी आहे असें वाटत नाही.

× × ×

प्रस्तुत अंकाबरोबरच खरोखरी माझी संपादकीय कामगिरी संपते. तीन वर्षांपूर्वी जेव्हां हें काम माझ्यावर सोंपविण्यांत आलें त्या वेळीं कागद आणि छपाओी यांमध्ये येअूं घातलेल्या अडचणींची कल्पना अर्थात् आली नव्हती. म्हणून पहिल्या वर्षी मराठीचा त्रैमासिक वाङ्मयसंसार, भाषाभगिनींचें वृत्त, महाराष्ट्राच्या विविध भागांतील वाङ्मयीन चळवळींचें वृत्त अित्यादि गोष्टी देण्याचा अुपक्रम मीं केला होता. यांसारख्या आणखी कांही सदरांचा प्रारंभ अुत्तरोत्तर करण्याचा संकल्प होता. पुढल्याच वर्षी कागदाविषयीच्या बिकट परिस्थितीमुळे पत्रिकेस मिळणारा कागदच फार कमी झाल्याने आणखी अुपक्रम करणें तर दूरच राहिलें, केलेले अुपक्रमहि चालविणें शक्य झालें नाही. पूर्वी अेक-दोन वर्षे चाललेल्या वार्षिक समालोचनाचा भागहि संपूर्णपणें देणें शक्य झालें नाहीं. कागदाची स्थिति आज बरीच सुधारली असली तरी अद्यापि पूर्ववत् झालेली नाही. तथापि ती लौकरच चांगली व्हावी असें वाटतें. तेव्हा पत्रिका पूर्ववत् भरदार निघूं लागेल अशी आशा आहे.

× × ×

पत्रिकेच्या संपादनाच्या कार्यात, विशेषतः परीक्षणें लिहिण्याच्या कामांत, ज्या अनेक व्यक्तींनी मला साह्य केलें त्यांचें मी येथे मनःपूर्वक आभार मानतों. परीक्षणाचें काम अनेक दृष्टींनी अफलदायी असतें. ग्रंथलेखकांखेरीज अितरांना परीक्षणें चांगलीं वाटलीं, तरी कोणत्याहि ग्रंथलेखकाचें त्यांनी समाधान होत नाही. विनाकारण वाओीटपणा घेण्याचा प्रसंग त्यांत अनेकदा येतो. स्वतंत्र लेखन-कर्तृत्वाच्या दृष्टीने परीक्षणकर्त्याच्या जमेस कांही लागतें की नाही याची शंकाच असते. शिवाय पत्रिकेंत लिहिण्याने आर्थिक लाभहि मुळींच नसतो. या साऱ्या कारणांमुळे परीक्षण लिहिण्यापेक्षा न लिहिण्या-कडेच प्रवृत्ति व्हावी ही गोष्ट साहजिक आहे. असें असतांहि पत्रिकेच्या परीक्षणलेखकांनी हें काम सतत व साक्षेपाने केलें असें म्हणावयास मला आनंद वाटतो. पत्रिका त्यांची सदैव ऋणीच राहील.

× × ×

म. सा. पत्रिकेविषयीं अनेकांच्या अनेक आकांक्षा आहेत. ती दर महिन्याला निघावी, तीमध्ये अधिक मजकूर यावा, तिचा संपादक हा सतत काम करणारा असा वेतनधारी असावा, लेखकांस व परीक्षणकर्त्यांस मोबदला मिळावा अित्यादि सूचनाहि तिच्याबाबत करण्यांत आल्या आहेत. पत्रिकेची आर्थिक स्थिति पाहतां या गोष्टी आजच शक्य आहेत असें वाटत नाही. तिच्या संपादकांनी महाराष्ट्रांतील साहित्यांतील प्रचलित घडामोडी किंवा वादविवाद यांना अधिकारवाणीने वळण लावावें, निदान त्यांची चर्चा करावी; अशीहि अपेक्षा व्यक्त करण्यांत आली आहे. स्थलाभावीं आपलें लेखन पत्रिकेंत देण्यापेक्षा अितरांच्या लेखनास जागा द्यावी व आपल्या वैयक्तिक मतांची झळ पत्रिकेस लागूं नये या द्विविध विचाराने तें काम मीं फारसें केलें नाही. मात्र तें करण्याजोगें आहे असें मलाहि वाटतें. माझ्या मागून येणारा संपादक तें करील अशी आशा आहे.

× × ×

# परिषद्‌वार्ता

( डिसेंबर १९४५ अखेर )

( चिटणिसांकडून )

**सभासदांस सूचनाः**--ता. २३-९-१९४५ रोजीं भरलेल्या विशेष साधारण सभेंत मंजूर झालेली घटना अन्यत्र छापली आहे. वास्तविक ही घटना यापूर्वीच सभासदांकडे पाठविणें अगत्याचें होतें, परंतु सध्या पुण्यांत छापण्यासंबंधींच्या अडचणी अेवढ्या मोठ्या प्रमाणावर अुद्भवल्या आहेत कीं अधिक आकार देअून सुद्धा थोडासा मजकूरहि छापून घेणें दुरापास्त झालें आहे. यामुळेच पत्रिकेचा अंक आणि त्यांत येणारी घटना फार अुशीरा सभासदांच्या हातीं पडत आहे. याबद्दल सभासदांनीं आम्हांस क्षमा करावी अशी विनंती आहे. अेक दोन महत्त्वाच्या गोष्टींकडे सभासदांचें लक्ष जावें म्हणून त्यांचा स्पष्ट निर्देश या ठिकाणीं करीत आहोंत.

१. नवीन घटनेप्रमाणे परिषदेचें वर्ष १ अेप्रिल ते ३१ मार्च असें ठरविलें गेलें आहे. जुन्या घटनेप्रमाणे चालू वर्ष डिसेंबर १९४५ अखेर पुरें झालें; म्हणून जानेवारी, फेब्रुवारी व मार्च १९४६ या मध्यंतरीं येणाऱ्या महिन्यासाठीं आणे १२ ची वर्गणी अधिक आकारण्यांत यावी असें ता. २३-९-१९४५ च्या विशेष साधारण सभेंत ठरलें आहे. म्हणून सभासदांनीं १९४६ साठीं पाठवावयाची वर्गणी रु. ३ आ. १२ पाठवावी अशी विनंती आहे. ही वर्गणी जानेवारी १९४६ ते मार्च १९४७ अखेर पर्यंतची समजली जाअील. संलग्न संस्थांनीहि रु. ३ आ. १२ ही वर्गणी पाठवावयाची आहे.

२. नियामक मंडळाच्या निवडणुकीची तारीख १५ फेब्रुवारी १९४६ ही निश्चित झाली आहे. निवडणूक पत्रकें व सभासदांची संपूर्ण यादी हीं सभासदांकडे आधीच रवाना झालीं असून ता. १५-१-१९४६ च्या आंत सूचितांच्या नांवांचा तक्ता योग्य रीतीने भरून कार्यालयाकडे यावयाचा आहे.

३. नवीन झालेल्या सभासदांचीं नावें अन्यत्र छापलीं आहेत. मान्यतेचीं निराळीं पत्रें पाठविलीं जाणार नाहीत.

**कार्यकारी मंडळः**-- ता. १६-९-१९४५ व ता. २४-१०-१९४५ रोजीं कार्यकारी मंडळाच्या सभा झाल्या.

**विशेष साधारण सभाः**-- मागील अंकांत निवेदन केल्याप्रमाणे म. सा. परिषद्-संमेलन एकात्मता समितीने सादर केलेल्या घटनाविषयक अहवालाचा विचार करण्यासाठीं ता. २३-९-४५ रोजीं परिषदेचे अध्यक्ष प्रा. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखालीं परिषदेची विशेष साधारण सभा भरली होती. त्या वेळीं एकात्मता समितीच्या अहवालाचा बारकाईने विचार होअून कांहीं दुरुस्त्या सुचविण्यांत आल्या व थोड्याशा फेरफारांसह तो अहवाल अेकमताने संमत करण्यांत आला. परिषदेची जुनी घटना रद्द होअून मंजूर झालेली नवीन घटना ता. २३-९-१९४५ पासून अंमलांत यावी असेंहि ठरलें. ( नवीन घटना अन्यत्र छापली आहे. )

**स्वाध्याय मंडळः**-- या मंडळामार्फत परिषदेचे प्राज्ञ व विशारद वर्ग नियमितपणें ता. १ डिसेंबरपर्यंत घेण्यांत आले. ता ४ डिसेंबर रोजीं विशारद वर्गाचें स्नेहसंमेलन मोठ्या अुत्साहाने साजरें करण्यांत आलें.

व्याख्यानसत्रः—फर्ग्युसन कॉलेजचे विद्वान् प्राध्यापक डॉ. दि. धों. कर्वे, अेम्. अेस्सी., पीअेच. डी., यांचीं "रासायनिक संश्लेषणाचें कार्य" या विषयावर फारच अुपयुक्त व अुद्बोधक व्याख्यानें ता. ५, ६ व ७ आक्टोबर रोजीं झालीं. परिषदेच्या बऱ्याच सभासदांनी व्याख्यानांचा फायदा घेतला. रसायनशास्त्राचा मानवी जीवनांत हरघडीं कसा अुपयोग होत आहे आणि यापुढे व्हावयाचा आहे याचें मार्मिक व परिणामकारक विवेचन डॉ. कर्वे यांनी तीन व्याख्यानांत केलें.

डॉ. माधवराव पटवर्धन स्मृति-दिनः-- ता. २९-९-४५ रोजीं प्रा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखालीं 'पटवर्धन स्मृति दिन' साजरा करण्यांत आला. त्या प्रसंगीं परिषदेचे तहहयात सभासद व महाराष्ट्रांतील सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. वि. स. खांडेकर यांचें "माधवरावांचें कवि-मन" या विषयावर अत्यंत परिणामकारक व्याख्यान झालें. या व्याख्यानाचे वेळीं श्रोत्यांची अतिशय गर्दी झाली होती. परिषदेसमोरील रस्ताहि श्रोतृवर्गानें भरून गेला होता. याच दिवशीं श्री. लीलाबाई पटवर्धन यांनी लिहिलेलें कै. डॉ. पटवर्धन यांचें चरित्र "आमचीं अकरा वर्षे" ह्या पुस्तकाचा प्रकाशनसमारंभ होअून लेखिकेचा सत्कार करण्यांत आला. राजकवि यशवंत व नाशिकचे कवि सोपानदेव चौधरी यांच्या काव्यगायनाचीं समारंभास विशेष जोड मिळाली होती. पटवर्धन स्मारक-मंदिर उभारण्यांत अत्यंत परिश्रम घेणारे श्री. वि. द. घाटे हेहि या स्मृति-दिनास अुपस्थित होते. श्री. गोपीनाथ तळवलकर, प्रा. क्षीरसागर व प्रा. निरंतर यांचींहि भाषणें या समारंभाचे वेळीं झालीं.

संमेलन आमंत्रणः— १९४६ च्या म. सा. परिषदेच्या वार्षिक साधारण सभेस (म. सा. संमेलन) वर्तमानपत्रांत प्रसिद्ध केल्याप्रमाणे पुढील संस्थांतर्फे आमंत्रणें आलीं आहेतः—

(१) पुणें—महाराष्ट्र शारदा मंदिर; (२) बेळगांव—वाङ्मय चर्चा मंडळ; (३) असोदे—हनुमान वाचनालय; (४) ठाणें—मराठी ग्रंथ संग्रहालय.

या आमंत्रणपत्रांचा विचार जानेवारीच्या अखेरच्या आठवड्यांत भरणाऱ्या नियामक मंडळा-मध्ये होईल.

भेटः--कलकत्ता विद्यापीठाचे विद्वान् प्राध्यापक श्री. सुनीतकुमार चतर्जी यांनी ता. ११।११।४५ रोजीं परिषदेस भेट देअून हिंदुस्थानांत सुरू होणाऱ्या नवीन चलनासंबंधी परिभाषा कशी असावी याबद्दल सभासदांबरोबर विचारविनिमय केला.

P. E. N. मार्फत जयपूर येथे ता. २० ते २२ आक्टोबर रोजीं भरलेल्या अखिल भारतीय लेखकअधिवेशनास परिषदेच्या वतीने प्रतिनिधि म्हणून प्रा. द. वा. पोतदार हे अुपस्थित राहिले.

शाखासभाः— ता. १९ डिसेंबर १९४५ रोजीं अहमदनगर येथे परिषदेची शाखासभा स्थापन करण्यांत आली. त्यासाठीं परिषदेचे अध्यक्ष प्रा. द. वा. पोतदार व चिटणीस प्रा. वा. दा. गोखले हे मुद्दाम नगर येथे गेले होते. शाखासभा स्थापन करण्याच्या-बाबतींत श्री. धनेश्वर, हिवर-गांवकर, पटवर्धन, डावरे अित्यादि कार्यकर्त्यांनी फार परिश्रम घेतले.

परीक्षाः— प्रतिवर्षी परीक्षाकार्याचा व्याप वाढत चालला आहे. या वर्षी केंद्रांची संख्या ५६ झाली असून सर्व परीक्षांना मिळून सुमारें १६९१ विद्यार्थी बसले. परीक्षेचें संपूर्ण अितिवृत्त वार्षिक निवेदनांत देण्यांत येअील. या वर्षी अमरावतीचे श्री. पारनेरकर, हैदराबादचे श्री. पोहनेरकर, रत्नागिरी जिल्ह्यांतील हिंदी शिक्षक श्री. मोडक बंधू, कोल्हापूरच्या राजाराम हायस्कूलचे मुख्याध्यापक श्री. ल. दे. सुर्वे अित्यादि परिषदेवर लोभ करणाऱ्या कार्यकर्त्यांनी परीक्षांच्या प्रचारांत फार मोठें

सहकार्य केलें. नाशिक येथे गतवर्षी उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांना प्रमाणपत्रकें देण्याचा समारंभ सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. दे. ना. टिळक यांच्या अध्यक्षतेखालीं नाशिकचे केंद्राधिकारी प्रि. मालेराव यांच्या सहकार्याने मराठा हायस्कूलमध्ये साजरा करण्यांत आला. नगर येथेहि शाखासभेच्या स्थापनेच्या वेळीं उत्तीर्ण झालेल्या उमेदवारांना प्रा. पोतदार यांच्या हस्तें प्रमाणपत्रें देण्यांत आलीं. कोल्हापूर येथे श्री. सुर्वे यांच्या मार्गदर्शनाखाली सुरू केलेल्या परीक्षावर्गाचें उद्घाटन सुप्रसिद्ध साहित्यिक प्रा. ना. सी. फडके यांनी केलें व राजाराम कॉलेजचे प्रिन्सिपल डॉ. पवार यांचें समारोपात्मक व्याख्यान झालें. या समारंभास शिक्षणाधिकारी रा. सा. कोलटकर, प्रा. पंगू इत्यादि साहित्यिक उपस्थित होते.

१९४६ पासून परीक्षेचा अभ्यासक्रम व पुस्तकें यांत बदल होणार असून त्यानुरूप लवकरच परीक्षापत्रक छापण्यांत येईल.

**पारितोषिक**— या वर्षी झालेल्या परिषदेच्या विशारद परीक्षेंत पहिल्या येणाऱ्या उमेदवारास कै. डॉ. रा. चिं. श्रीखंडे, कोल्हापूर, यांनी रु. २५ चें पारितोषिक ठेविलें आहे.

**संलग्न संस्था व इतर वृत्तः**— नागपूर येथील राजाराम वाचनालयाचा सुवर्णमहोत्सव सुप्रसिद्ध साहित्यिक श्री. न. चिं. केळकर यांच्या अध्यक्षतेखाली ता. १४ ते १६ आक्टोबर रोजीं साजरा करण्यांत आला. ही संस्था १८६९ मध्ये स्थापन झाली असून आज रोजीं वाचनालयांत १५००० पुस्तकें आहेत. १५०० समासद आहेत. याच उत्सवप्रसंगीं रा. सा. रंगनाथन् यांचे अध्यक्षतेखाली प्रांतिक वाचनालय परिषद् भरविण्यांत आली होती. श्रीसरस्वतीमंदिर, नवीन गोवें, या संस्थेचा ३२ वा वाढदिवससमारंभ श्री. द. पां. सरदेसाई यांच्या अध्यक्षतेखाली मोठ्या थाटांत आणि उत्साहाने साजरा करण्यांत आला. या वाचनालयांत ६९८१ पुस्तकें असून समासदांची संख्या २७४ आहे. गोमांतकांतील ज्ञानप्रसारक संस्थेमध्ये श्रीसरस्वतीमंदिराचें स्थान बरेंच वरच्या दर्जाचें आहे.

शरद् प्रकाशन मंडळ, ग्वाल्हेर, या संस्थेमार्फत दि. ७, ८ व ९ डिसेंबर रोजीं कै. राजकवि भास्करराव तांबे यांचा स्मृतिदिन इंदूरचे प्रसिद्ध कवि श्री. काळेले यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यांत आला. स्वागताध्यक्ष प्रा. ना. बा. पराडकर व अध्यक्ष कविवर्य काळेले यांचीं या प्रसंगीं व्याख्यानें झालीं.

सातारा शाखासभेचे कार्याध्यक्ष राजकवि यशवंत यांचा "ओजस्विनी" हा नवीन कवितासंग्रह मुंबईचे प्रसिद्ध प्रकाशक श्री. के. भि. ढवळे हे लवकरच प्रसिद्ध करणार आहेत.

परिषदेचे कार्याध्यक्ष श्री. कृ. ग. उर्फ काकासाहेब लिमये हे सध्या अर्धांगवायूच्या सौम्य आघाताने आजारी आहेत. सध्या त्यांची प्रकृति सुधारत असून लवकरच ते पूर्ण बरे होतील असें मत त्यांच्या सल्लागार डॉक्टरांनी व्यक्त केलें आहे. श्री. काकासाहेब लवकर बरे होवोत असें आम्ही इच्छितों.

या वर्षी पुढील दिवाळी अंक परिषदेकडे आले आहेतः—

१ नवयुग, २ मौज, ३ समीक्षक, ४ महाराष्ट्र, ५ दैनिक समाचार, ६ अभिरुचि, ७ रागिणी, ८ भगिनी, ९ ध्रुव, १० चित्ररेखा, ११ चित्रमयजगत्, १२ वाङ्मयशोभा, १३ वऱ्हाड-शालापत्रक, १४ मन्दार, १५ यशवंत (दसरा), १६ नवशक्ति, १७ महाद्वार, १८ धनुर्धारी.

---

म. सा. प. (१८-४-७)

# साभार स्वीकार



१ **मराठी नाट्यसृष्टि-सामाजिक नाटकें खंड २ रा**— ले० विश्वनाथ पांडुरंग दांडेकर, बडोदें; मूल्य रु. ४.

२ **चितोडगड**— ले० आनंदीबाओी जयवंत; प्रका० पुरुषोत्तम आत्माराम चित्रे, बडोदें; मूल्य रु. ।=.

३ **शिकार**— ले० आनंदीबाओी जयवंत; प्रका० श्रीसयाजी बालज्ञान माला, पुष्प १८५; मूल्य रु. ।।।

४ **सुधारणा, सुख व सदाचार**-- ले० न. चिं. केळकर; प्रका० वि. गं. केतकर, अनाथ विद्यार्थी गृह, पुणें; मूल्य रु. १।.

५ **ऐतिहासिक पोवाडे अथवा मराठ्यांचा काव्यमय इतिहास, खंड २ रा**— ले० यशवंत नरसिंह केळकर; प्रका० य. न. केळकर, पुणें; मूल्य रु. १।=॥.

६ **हिंदु कायद्यांत स्त्रियांचें स्थान**— ले० के. बा. गजेंद्रगडकर; प्रका० के. बा. गजेंद्रगडकर, सातारा; मूल्य रु. १८=.

७ **सुवर्णतुला**— ले० श्रीकृष्ण केशव क्षीरसागर; प्रका० मोरारजी पदमसी, पद्म प्रकाशन, मुंबओी; मूल्य रु. ३.

८ **संस्कृत काव्यवाङ्मय**— ले० रा. श्री. जोग; प्रका० गणेश गंगाधर जांभेकर, पुणें; मूल्य; रु. २॥.

९ **रत्नजडित मूर्ति**— ले० मधुकर अर्नाळकर; प्रका० वि. द. चिंदरकर, कांचनमाला, मुंबओी; मूल्य रु. ॥.

१० **प्रीझन कॅटलॉग**— स्टेट रेकॉर्डस् डिपार्टमेंट, बडोदा; मूल्य रु. ।।।≊

११ **ग्रंथांच्या सहवासांत**— ले० गं. भा. निरंतर; प्रका० वि. वा. हडप, आदर्श वा. प्र., पुणें; मूल्य रु. २.

१२ **हिवाळ्यांतलें इंद्रधनुष्य**— ले० वां. दा. वासिल्येकर; अनु० स. ह. मोडक; प्रका० लोक साहित्य, मुंबओी; मूल्य रु. ४.

१३ **राम-नाट्य-गीत**— ले० रं. न. होनप; प्रका० दा. न. शिखरे, पुणें; मूल्य रु. ।।।

१४ **संताचा प्रसाद**— ले. विनोबा; प्रका० राधाकृष्ण बजाज मंत्री, ग्रामसेवा मंडळ, वर्धा; मूल्य रु. ।।।

१५ **भारतनेते**— ले० युसफ येहरअली; अनु० ना. मा. संत; प्रका० पद्मा प्रकाशन, मुंबओी; मूल्य रु. १.

१६ **चौफुला**— ले० आचार्य स. ज. भागवत; प्रका० द. र. कोपर्डेकर, पुणें; मूल्य रु. १.

१७ **प. वा. सीतारामपंत जव्हेरे यांचें चरित्र**— ले० कृष्णाबाओी जव्हेरे; प्रका० कृष्णाबाओी जव्हेरे, मुंबओी; मूल्य रु. २.

१८ **दूध-दुभतें**— ले० साराबाओी प्रतापराव; अनु० चिं. ग. कर्वे; प्रका० वि. ग. केतकर, अ. वि. गृह, पुणें; मूल्य रु. ।।।

१९ स्वप्नतरंग— ले० शान्ता शेळके; प्रका० ज. ग. जोशी, पुणें; मूल्य रु. ३

२० कलेचे कटाक्ष— ले० धनंजय ,, मूल्य रु. २.

२१ मराठी कवितेचें अध्यापन— ले० म. वि. फाटक; प्रका० मॉडर्न बुक डेपो, पुणें; मूल्य रु. १॥.

२२ श्रीकरपंत— ले० प्रो. रा. म्हा. वाघमारे; प्रका० प्रो. वाघमारे, स्वयंप्रकाशन माला, बडोदें; मूल्य रु. ४.

२३ कांहीं मराठी लेख– ले० शणै गोंयबाब; प्रका० का. त्रि. नायक, मुंबआी; मूल्य रु. ८.

२४ जळतें रहस्य— ले० मा. ब. वोरकर; प्रका० दा. ना. मोघे, कोल्हापूर; मूल्य रु. २.

२५ बुद्धिमापनपद्धति व सुलभ मापनशास्त्र– ले० अत्तरदे–बापट; प्रका० गो. य. राणे, पुणें; मूल्य रु. १॥।=.

२६ सामायिक पाठ— ले० रावजी नेमचंद शहा; प्रका० श्रीवीर ग्रंथमाला, सांगली.

२७ तिघी जणी— ले० ग. रा. वाळिंबे उर्फ रामतनय; प्रका० अ. न. साठे, किताब-मिनार प्रकाशन; मूल्य रु. ३.

२८ अठराश्लोकी गीता— ले०– पु. पां. गोखले; प्रका० सौ. सुलोचना गोखले, कऱ्हाड; मूल्य रु. ८

२९ The Decimal and Colon Classifications— ले० आर्. अेस्. पारखी; प्रका० अेस्. व्ही. दामले, अेन्. के. पब्लिशिंग हाअुस, पुणें; मूल्य रु. २।.

३० Classification of Marathi Literature— ले० अे. आर्. रंगनाथन्; प्रका० अेस्. व्ही. दामले, अेन्. के. पब्लिशिंग हाअुस, पुणें; मूल्य रु. १।.

३१ गोड गुपित— ले० दत्तात्रेय केशव बर्वे; प्रका० कर्नाटक पब्लिशिंग हाअुस, मुंबअी; मूल्य रु. ।||·

३२ देवमाणूस— ले० नागेश जोशी; प्रका० मॉडर्न बुक डेपो, पुणें; मूल्य रु. १।.

३३ चिंचा आणि बोरें— ले० शं. गो. साठे; प्रका० श्री. वि. दामले, अेन्. के. प्रकाशन, पुणें; मूल्य रु. १.

३४ अुगवत्या दिशेकडे– ले० मध्यवर्ती कुमार साहित्य मंडळ; प्रका० गो. रा. पाटणकर; कॉन्टिनेन्टल बुकसर्व्हिस, पुणें; मूल्य रु. ।॥·

३५ ज्ञानेश्वरी सोळावा अध्याय— ले० प्रा. द. सी. पंगु; मूल्य रु. ३.

## स्वाध्याय-माला– अ. वि. गृह यांचीं प्रकाशनें

३६ राणी दुर्गावती— ले० सौ. स्नेहलता दसनूरकर; मूल्य रु. ।·
३७ अहिल्याबाअी होळकर— ले० मो. रा. जोशी; मूल्य रु. ।·
३८ थोरले माधवराव— ले० प्रा. द. वा. पोतदार; मूल्य ।·
३९ अंगुलिमाल— ले० द. गं. कोपरकर; मूल्य ।·
४० प्रगतिपथावर अजित— ले० रामतनय; मूल्य ।·
४१ चंद्र— ले० य. ब. पटवर्धन; मूल्य ।·
४२ गङ्गा— ले० प्रा. म. वि. फाटक; मूल्य ।·
४३ कादम्बरी— ले० गो. प्र. सोहोनी; मूल्य ।·
४४ तात्या टोपे— ले० का. न. केळकर; मूल्य ।·
४५ मातीचें सोनें— ले० प्रा. मो. शं. मुळ्ये; मूल्य रु. ।·

## के. भि. ढवळे, मुंबई, यांचीं प्रकाशनें

४६ एक प्रश्न— ले० द. ग. प्रधान; मूल्य रु. ।≈.
४७ प्रभावती— ले० वामन चोरघडे; मूल्य रु. ।।.
४८ चिंगी— ले० न. धों. ताम्हनकर; मूल्य रु. १।.
४९ नाकेबंदी— ले० र. गं. विद्वंस; मूल्य रु. १।।.
५० श्रीज्ञानेश्वरी-सोळावा अध्याय— संपा० प्रा. श्री. रा. पारसनीस आणि श्री. गो. कृ. मोडक; मूल्य रु. ३.

---

## नवीन सभासद

**तहह्यात सभासद**— श्री. शि. श्री. वाशीकर, मुंबई (साधारणांतून); श्री. धों. वा. गद्रे, बुधगांव (साधारणांतून); श्री. द. ज. गोखले, पुणें (साधारणांतून); श्री. म. शं. कानेटकर, मुंबई; श्री. व. शं. कानेटकर, सांगली; प्रा. डॉ. दि. धों. कर्वे (साधारणांतून).

**साधारण**—श्री. चंपूताई तगारे, सातारा; सौ. कालिंदीबाई करंदीकर, सातारा; श्री. व. द. जोशी, सातारा; श्री. व. श्री. सातवळेकर, औंध; श्रीमंत आबासाहेब पंत, औंध; श्री. रा. का. किर्लोस्कर, औंध; श्री. वा. रा. हिवरेकर, औंध; श्री. ए. गो. इनामदार, औंध; श्री. व. अ. श्रोत्री, कराड; श्री. श्री. ह. शहाणे, औंध; श्री. वा. शं. खराडे, पुणें; श्री. गो. वि. माटे, हुबळी; श्री. वा. ना. आपटे, हुबळी; श्री. य. वा. काळे, पुणें; ग. कृ. जोशी, पुणें; श्री. श्री. ना. कोल्हटकर, धारवाड; प्रि. गो. वि. लेले, पुणें; श्री. पु. रा. पारनेरकर, अमरावती; श्री. ग. वि. अकोलकर, नाशिक; श्री. र. रा. देशपांडे, वाई; श्री. ना. गो. सामंत, धुळें; श्री. प्र. कृ. वाखारकर, धुळें; श्री. द. ना. नाबर, सातारा; डॉ. रा. द. देशपांडे, सातारा; श्री. शि. वि. मोडक, सातारा; श्री. बा. शा. कुलकर्णी, पुणें; श्री. म. वि. सोवनी, पुणें; श्री. वि. रा. डोंगरे, मुंबई; श्री. य. के. खरे, नाशिक; डॉ. वि. बा. पटवर्धन, नाशिक; श्री. का. पु. वैशंपायन, नाशिक; श्री. ज. वि. कामत, गोवा; श्री. वि. शं. नाईक, गोवा; श्री. रा. गि. कामत, गोवा; श्री. सु. कृ. कामत, गोवा; श्री. य. शि. कुंडईकर, गोवा; श्री. वा. शि. कुंडईकर, गोवा; श्री. ना. सो. मावजेकर, गोवा; श्री. ना. अ. महाले, गोवा; श्री. श्री. मा. कामत, गोवा; श्री. व्य. वि. पै, गोवा; श्री. ल. श्री. सूर्यराव सरदेसाई, गोवा; श्री. मु. प. प्रभु शिखरे, गोवा; श्री. य. ना. सरमळकर, गोवा; श्री. पां. रा. माटीकर, गोवा; श्री. व. वै. कारे, गोवा; श्री. तु. गो. बोरकर, गोवा; श्री. श्री. का. नायक, गोवा; श्री. य. ज. दणाईत, गोवा; श्री. पां. गां. नाईक शिरोडकर, गोवा; श्री. न. पु. सुकेरकर, गोवा; श्री. र. शा. कामत, गोवा; श्री. वा. रा. पै रायतुरकर, गोवा; श्री. कों. वि. रायकर, गोवा; श्री. सां. घ. कंटक, गोवा; डॉ. कृ. वा. मुंज, गोवा; श्री. कृ. वा. नाईक, गोवा; प्रा. बा. भ. बोरकर, गोवा, प्रा. रा. शं. नायक, गोवा; श्री. वि. पां. पै मले, गोवा; श्री. वि. रा. केणी, गोवा; श्री. ग. के. खंडपारकर, गोवा; श्री. मा. श्री. वेर्लिंगकर, गोवा; श्री. रा. वै. शेल्ये, गोवा; श्री. स. रा. केणी, गोवा; श्री. य. रा. कामत शंखावळीकर, गोवा; श्री. रा. ना. शेल्ये, गोवा; प्रा. रा. ना. धोंड, गोवा; श्री. म. कृ. नायक, मुंबई; श्री. ना. त्रिं. भिडे, पुणें; श्री. दुर्गा नूलकर, अहमदनगर; श्री. वि. गो. बावधाने, अहमदनगर; श्री. द. के. गद्रे, रायपूर; श्री. शेख मोहियुद्दीन अहमद, पुणें; श्री. नी. कृ. देशमुख, हैदराबाद; श्री. श्री. प. म्हात्रे, मुंबई; सौ. मधुमालती कुलकर्णी, पुणें; श्री. पु. ग. ब्रह्मे, पुणें; वा. शि. आपटे, सोलापूर.

# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## घटना

[कोल्हापुरीं ता. २८-१२-३२ च्या साधारण सभेने मंजूर केलेल्या व नागपुरास ता. २४-१२-३३ च्या वार्षिक साधारण सभेंत दुरुस्ती झालेल्या परिषदेच्या घटनेची पुन्हा दुरुस्ती जळगांवीं ९-११-३६ या तारखेस वा. सा. सभेने केली. ही दुरुस्त केलेली घटना ता. १-१-३७ पासून अंमलांत आली. ता. ७-२-३७ च्या वि. सा. सभेंत व ता. ७-४-३९ च्या वा. सा. सभेंत कांहीं दुरुस्त्या करण्यांत आल्या. नंतर धुळें येथे ता. २५-१२-४४ रोजीं भरलेल्या वा. सा. सभेंत घटनेंतील सरनाम्यांत दिलेलें संमेलन-परिषद् ऐकात्मतेचें ध्येय सिद्ध होण्याचा विचार करण्याची वेळ व परिस्थिति प्राप्त झाली आहे असा ठराव झाला. त्या ठरावान्वयें परिषदेची ता. ३१-३-४५ रोजीं वि. सा. सभा भरून संमेलन-परिषद् ऐकात्मता समिति घटनेंत योग्य त्या दुरुस्त्या करण्यास नेमण्यांत आली. त्या समितीने तयार केलेली घटना परिषदेच्या ता. २३-९-४५ च्या वि. सा. सभेंत संमत करण्यांत आली व त्या दिवसापासूनच पूर्वीची घटना रद्द होऊन ही दुरुस्त केलेली घटना अंमलांत आली.]

१. **नांवः**— महाराष्ट्र-साहित्य-परिषद्.

२. **उद्देशः**— मराठी भाषा व साहित्य यांच्या अभिवृद्ध्यर्थ प्रयत्न करणें, उपाय योजणें, व इतर रीतीने झटणें आणि त्यांच्या अभ्यासास प्रोत्साहन देणें हे परिषदेचे प्रधान उद्देश आहेत.

३. **साधनेंः**— वरील उद्देश साध्य होण्याकरिता व त्यांस अनुसरून खालील, तसेंच इतर अवश्य व योग्य वाटतील त्या, साधनांचा उपयोग करणें.

(अ) दरसाल परिषदेचीं प्रादेशिक व अखिल महाराष्ट्रीय संमेलनें भरविणें व भरविण्यास प्रोत्साहन देणें.

(आ) अखिल-महाराष्ट्रांत ठिकठिकाणीं परिषदेच्या शाखा-सभा स्थापन करणें, व स्वतंत्र रीतीने कार्य करणाऱ्या साहित्य-संस्था संलग्न करून घेणें, व सहकारी म्हणून जोडून घेणें.

(इ) अन्य भाषांच्या साहित्यसंस्थांशीं व साहित्यविषयक चळवळींशीं अवश्य व शक्य असेल तेथे सहकार्य करणें.

(ई) व्याकरण व कोश, इतिहास, विज्ञान व समाजशास्त्र, तसेंच कला, साहित्य इत्यादि विषयांवरील ग्रंथ लिहून घेणें, प्रसिद्ध करणें व अशा तऱ्हेच्या ग्रंथनिर्मितीस द्रव्यद्वारा अगर अन्य रीत्या साहाय्य करणें.

(उ) विज्ञानशास्त्राचें व तदनुसार सामाजिक व साहित्यिक विचारप्रवाहांचें ज्ञान मराठी वाचकांना सुलभ करून देण्याकरिता चर्चा, उत्सव व प्रदर्शन आदि प्रसंग घडवून आणणें; मासिकें, नियतकालिकें चालविणें; संशोधनास मदत व उत्तेजन देणें.

(ऊ) शास्त्रीय विषयांची परिभाषा ठरविणें व पारिभाषिक कोश तयार करणें.

(ए) प्राचीन व अर्वाचीन मराठी, तसेंच अन्य भाषांतील नामवंत लेखक व ग्रंथकार यांचीं चरित्रें व त्यांच्या साहित्याची माहिती मराठी वाचकांस उपलब्ध करून देणें.

(ऐ) मराठी भाषेच्या व साहित्याच्या आड येणाऱ्या अडचणी दूर करण्यासाठीं जरूर ती उपाययोजना करणें. तसेंच मराठी भाषा बोलणाऱ्या बहुजनसमाजाचा पाठिंबा मिळावा म्हणून अशा प्रश्नांविषयी योग्य व शक्य त्या साधनांनी जागृति घडवून आणणें.

(ओ) सामान्यतः परिषदेचे उद्देश साध्य होण्याकरिता जरूर वाटतील त्या सर्व गोष्टी करणें.

४. **वर्षगणनाः**— परिषदेचें वर्ष १ एप्रील ते ३१ मार्च असावें.

५. **कचेरीः**— परिषदेची कायमची कचेरी पुणें येथे राहावी. परिषदेचें शिलकी दप्तर, पुस्तकालय आणि परिषदेची जी इतर जिंदगी वगैरे परिषदेची साधारण सभा नेमून देईल त्या

अनुक्रमणिका

सर्वांचा संग्रह आणि संरक्षण या कायम कचेरींतच होईल. शिवाय या कचेरींत परिषदेचा इतर कोण-ताहि व्यवहार साधारण सभेच्या टरावान्वयें चालवितां येईल. परिषदेचें चालू काम व चालतें दप्तर किंवा अन्य कांही विवक्षित कार्यें हीं परिषदेच्या साधारण सभेने तसा स्पष्ट ठराव केल्यास अन्य स्थळीं त्या टरावाने चालवितां येतील. अशा वेळीं कायमची मुख्य कचेरी आणि फिरत्या पोट-कचेऱ्या यांचे संबंध सुसूत्र राहण्यासाठीं वेळोवेळीं साधारण सभेने निर्बंध घालून द्यावे.

६. **सभासदवर्गः**— परिषदेचे सभासद पुढीलप्रमाणे आठ प्रकारचे असतीलः—

(१) **उपकर्तेः**— परिषदेस पांच हजार (५०००) किंवा अधिक रुपये देणारे.

(२) **आश्रयदातेः**— परिषदेस एक हजार (१०००) किंवा अधिक रुपये देणारे.

(३) **साहाय्यकः**— परिषदेस पांचशें (५००) किंवा अधिक रुपये देणारे.

(४) **हितचिंतकः**— परिषदेस दीडशें (१५०) किंवा अधिक रुपये देणारे.

(५) **तहह्यात सभासदः**— परिषदेस पन्नास (५०) किंवा अधिक रुपये देणारे.

(६) **साधारण सभासदः**— वार्षिक वर्गणी रु. ३ किंवा अधिक रुपये देणारे.

(७) **प्रतिनिधि सभासदः**– घ.नि.११ (अ) प्रमाणे संलग्न संस्थांनी नेमिलेले प्रतिनिधि.

(८) **सन्मान्य सभासदः**— अलौकिक विद्वत्ता अथवा मराठी भाषेची विशेष सेवा या गुणांसाठी कोणाहि साहित्यिकास परिषदेचे सन्मान्य सभासद करावे अशी लेखी सूचना परिषदेच्या दहा सभासदांनी केल्यास त्या सूचनेवर कार्यकारी मंडळाने परिषदेच्या सभासदांचीं लेखी मतें मागवावीं व परिषदेच्या दोनतृतीयांश सभा-सदांचें त्या सूचनेस अनुकूल मत असल्यास अशा साहित्यिकास परिषदेचें सन्मान्य सभासद निवडल्याचें त्यापुढील साधारण सभेंत जाहीर करण्यांत यावें.

७. **सभासद मंजुरीः**—सभासद होऊं अिच्छिणाऱ्या अठरा वर्षांवरील कोणाहि स्त्रीने अगर पुरुषाने परिषदेचे अुद्देश, घटना व नियम मान्य करून ठरलेल्या नियमाप्रमाणे वर्गणीसह अर्ज करावा. कार्यकारी मंडळाने आपल्या प्रथमच्या सभेंत कार्याध्यक्ष, परिषदेचे अेक चिटणीस आणि आपणांतून निवडून दिलेले दोन सभासद अशा चार सभासदांची अेक अुपसमिति नेमावी. या अुप-समितीने सभासदत्वाच्या सर्व अर्जांचा निर्णय करावा. अर्ज पोचल्यापासून अेक महिन्याचे आंत त्या अर्जांचा निकाल अर्जदारांस कळविला पाहिजे. सदर समितीने नामंजूर केलेले अर्ज ताबडतोब कार्य-कारी मंडळाकडे पाठवावे व त्यांचा निर्णय कार्यकारी मंडळाने करावा.

८. **सभासद अधिकारः**—(अ) कोणाहि अर्जदारास त्याच्या सभासदत्वास मंजुरी मिळाल्या-पासून परिषदेच्या सर्व सभांस हजर राहण्याचा, येथे होणाऱ्या चर्चेत भाग घेण्याचा, मत देण्याचा, कार्यकारी मंडळाने गुप्त म्हणून ठेवलेल्या कागदपत्रांव्यतिरिक्त हिशेब, दप्तर व अितर कागदपत्र पाहण्याचा, हे व अितर सर्व प्रकारचे सभासदत्वाचे अंगभूत हक्क राहतील. परंतु घटनाविषयक प्रश्न, सर्व प्रकारचे आर्थिक प्रश्न, म. सा. प. चा वार्षिक अहवाल, अंदाजपत्रक व घटनानियमानुसार होणाऱ्या निवडणुकी अित्यादि बाबींसंबंधाने मत देण्याचा अधिकार फक्त अशाच सभासदांस राहील की जे सभासद म्हणून मंजूर झाल्यापासून बारा महिने पूर्ण झाले असतील.

(आ) परिषदेचें दप्तर, कागदपत्र, हिशेब वगैरे तपासणें असल्यास तशा अर्थाची कमींत कमी तीन दिवसांची पूर्वसूचना चिटणीसांस दिल्याने पाहिजे असलेले कागदपत्र, कार्यकारी मंडळाने गुप्त म्हणून ठरविलेल्या कागदपत्रांव्यतिरिक्त, कचेरीच्या वेळांत पाहावयास मिळतील.

९. **सभासद वर्गणी, थकबाकी अित्यादिः**— (अ) साधारण सभासदांनी प्रत्येक वर्षाच्या पहिल्या तिमाहींत आपली सभासदत्वाची वर्गणी भरली पाहिजे. कोणत्याहि सभेंत किंवा निवडणुकींत वर्गणी बाकी असणाऱ्या कोणाहि सभासदास मत देतां येणार नाही.

(आ) लागोपाठ दोन वर्षांची वर्गणी थकली असेल अशा सभासदास व्यक्तिशः लेखी पंधरा

दिवसांची पूर्वसूचना देऊन कार्यकारी मंडळाच्या संमतीने चिटणीसास त्याचें नांव पटावरून काढून टाकतां येईल. अशा व्यक्तीस पुनः समासद होणें असल्यास बाकी थकलेली सर्व वर्गणी सभासदत्वाच्या नूतन अर्जासोबत भरली पाहिजे.

१०. अधिकारमंडळें:—परिषदेचीं दोन अधिकारी मंडळें असावींत: (१) नियामक मंडळ, व (२) कार्यकारी मंडळ.

११. नियामक मंडळ:— नियामक मंडळाची रचना खालीलप्रमाणे असावी:-

(अ) अधिकारपरत्वें सभासद:— १ अध्यक्ष, ५ उपाध्यक्ष, १ कार्याध्यक्ष, व १ खजिनदार असे ... ... ... ... ... ... ... ८

(आ) प्रादेशिक सभासद:— या निवडणुकीकरिता समासदांचे पुढीलप्रमाणे गट करण्यांत येत आहेत; यांपैकी प्रत्येक गटामागे कमींत कमी १ आणि अधिकांत अधिक १० समासद खालीलप्रमाणे निवडतां येतील:—ज्या गटांत १५ किंवा १५ पेक्षा कमी सभासद असतील त्या गटामागे १ समासद, व (२) ज्या गटांत १५ पेक्षा अधिक सभासद असतील त्या गटाकरिता दर १५ च्या पूर्ण संख्येस १ याप्रमाणे अधिक समासद निवडतां येतील. पण कोणत्याहि गटातर्फे १० पेक्षा अधिक समासद नियामक मंडळावर निवडले जाणार नाहीत.

(१) मुंबई, (२) दादर व दादरच्या उत्तरेकडील मुंबई बेट व उपनगरें, (३) पुणें शहर व जिल्हा आणि भोर संस्थान, (४) सातारा जिल्हा आणि औंध व फलटण हीं संस्थानें, (५) अहमदनगर जिल्हा, (६) नाशिक जिल्हा, (७) पूर्व खानदेश, (८) पश्चिम खानदेश, (९) सोलापूर जिल्हा, व अक्कलकोट व मुधोळ हीं संस्थानें, (१०) ठाणें जिल्हा व जव्हार संस्थान, (११) कुलाबा जिल्हा व जंजिरा संस्थान, (१२) रत्नागिरी जिल्हा, (१३) बेळगांव व कारवार जिल्हे व सावंतवाडी, (१४) धारवाड व विजापूर जिल्हे व जत संस्थान, (१५) अकोला जिल्हा, (१६) यवतमाळ जिल्हा, (१७) बुलढाणा जिल्हा, (१८) अमरावती जिल्हा, (१९) मध्यप्रांत शाखा-सभा, (२०) मराठवाडा (औरंगाबाद, नांदेड, बीड, परभणी), (२१) हैदराबाद शहर व संस्थानचा अवशिष्ट भाग, (२२) कोल्हापूर संस्थान, (२३) दक्षिणी मराठी संस्थानें (सांगली, मिरज, बुधगांव, जमखंडी, कुरुंदवाड), (२४) गोमंतक, (२५) बडोदें संस्थान, (२६) गुजरात व काठेवाड, (२७) सिंध, (२८) इंदूर संस्थान, (२९) ग्वाल्हेर, धार, देवास हीं संस्थानें, मध्यहिंदुस्थान व राजपुताना, (३०) बंगाल, बिहार, उत्कल, आसाम व नेपाळ, (३१) दिल्ली, पंजाब व वायव्यसीमाप्रांत, (३२) दक्षिण हिंदुस्थान (मद्रास इलाखा, म्हैसूर व कूर्ग, कोचीन, त्रावणकोर, (३३) संयुक्त प्रांत.

(इ) संलग्न संस्थांचे प्रतिनिधि:— ५० किंवा अधिक सभासद असल्यास प्रत्येक संस्थेस एक. ५० पेक्षा कमी समासद असल्यास एकाच प्रादेशिक विभागांतील संस्था एकत्र होऊन ५० संख्या झाल्यास त्या सर्वांस मिळून एक.

(ई) स्वीकृत सभासद (निवडून आलेल्या समासदांनी लेखी दिलेल्या मतांनी)......१०

१२. अध्यक्षाची निवडणूक:—परिषदेच्या सभासदांनी आपल्यामधील एकाची अध्यक्ष म्हणून निवड करावी. निवडणुकीच्या तारखा व मतदानासंबंधींचे आनुषंगिक पोटनियम का. मं. ने करावेत. अध्यक्षीय निवडणुकीकरिता प्रतिवर्षी निवडणुकीच्या पूर्वी मतदार सभासदांची यादी प्रत्येक समासदाकडे पाठवावी. शाखासभा, संलग्न संस्था व सभासद यांनी आपल्या पसंतीचें एक नांव चिटणीसाकडे पाठवावें. ठरलेल्या मुदतीपर्यंत जीं नांवें येतील त्यांची मतपत्रिका तयार करून ती ठरलेल्या मुदतींत मतदानासाठी समासदांकडे पाठवावी. त्यांनी आपल्या पसंतीच्या उमेदवारांसाठी ठरलेल्या पद्धतीप्रमाणे व मुदतींत मतें नोंदवून मतपत्रिका कार्यालयाकडे परत धाडाव्यात. या सर्व मतपत्रिकांतील मतांची नोंदणी का. मं. ने त्या कामाकरिता स्वतः उमेदवार नसतील अशा दोन व्यक्तींची नेमणक करून त्यांजकडून करवावी. ज्या उमेदवारास सर्वांत अधिक मतें मिळतील तो अध्यक्ष

निवडला गेला असें मानलें जाईल व तो नव्या वर्षाच्या प्रारंभापासून अधिकारारूढ होईल.

[अध्यक्ष अधिकार, नियम पाहाः– १७, २३, २५, ३१आ, ४६ (५आ, ६अ, ८, ९, १०].

१३. **नियामक मंडळाची निवडणूकः—** (अ) नियामक मंडळांतील अध्यक्षाखेरीज इतर पदाधिकारी व प्रादेशिक सभासद यांची निवडणूक त्रैवार्षिक असावी व ती लेखी मतें मागवून करण्यांत यावी. या निवडणुकीकरिता त्या त्या विभागांतील अुमेदवारासच त्या त्या विभागातर्फे निवडून येतां येअील व शाखासभा नसतील तेथील सभासदांची निवडणूक सर्व सभासद गुप्तमतदानपद्धतीने करतील.

[ नियामक मंडळाचीं कामें वगैरे नियम पाहाः— १५, २४ ते २८ ].

(आ) परिषदेच्या कचेरींत पत्ता नोंदला असेल त्याप्रमाणे सभासदाचा विभाग समजण्यांत यावा. पत्ता बदलला असल्यास सभासदाने निवडणुकीच्या दिवसाच्या निदान तीन महिने आधी कचेरीकडे तसें लेखी कळविलें पाहिजे.

(इ) निवडणुकीच्या आधी दोन महिने सभासदांची यादी छापून ती चिटणीसांनी सर्व सभासदांकडे पाठवावी व त्यांजकडून निरनिराळ्या विभागांतील निवडणुकीकरिता सूचितांचीं नांवें मागवावीं.

(ई) सूचना करणाराने सूचित उमेदवाराची अनुमति मिळवून ती मिळविल्याबद्दल सूचकाने कचेरीकडे लेखी कळविलें पाहिजे.

(उ) निवडणुकीच्या दिवसाच्या आधी निदान एक महिना सूचितांचीं नांवें सूचक व अनुमोदक यांच्या सहीने चिटणीसांकडे आलीं पाहिजेत. चिटणीसांनी प्रत्येक निवडणुकीच्या मतदानपत्रिका व सूचित उमेदवारांच्या याद्या मतदारांकडे निवडणुकीच्या दिवसाच्या निदान पंधरा दिवस आधी रवाना केल्या पाहिजेत.

(ऊ) सूचित उमेदवारांपैकी ज्यांना अधिक मतें पडतील ते निवडून आले असें समजावें. एकाहून अधिक उमेदवारांस सारखीं मतें पडल्यास चिठ्या टाकून त्यांतील एक निवडला जाईल.

(ऋ) प्रत्येक संलग्न संस्थेने पुढील नियामक मंडळावर पाठवावयाच्या आपल्या प्रतिनिधीचें नांव परिषदेच्या कचेरीकडे निवडणुकीपूर्वी एक महिना पाठवावें.

१४. **कार्यकारी मंडळाची रचनाः—** (अ) कार्यकारी मंडळाचे ८ सभासद गुप्त, लेखी मतदानपद्धतीने नियामक मंडळाने आपणांतून निवडावे. हे ८ सभासद, कार्याध्यक्ष व खजिनदार मिळून १० जणांचें कार्यकारी मंडळ होईल. या कार्यकारी मंडळाने आपल्या पहिल्या सभेंत दोन अधिक सभासद स्वीकृत करून घ्यावे. हे दोन सभासद इतर रीतीने नियामक मंडळाचे सभासद नसल्यास ते अधिकारपरत्वें नियामक मंडळाचे सभासद होतील.

(आ) कार्यकारी मंडळाने २ चिटणीस व संपादक या १२ सभासदांतून निवडावे.

[कार्यकारी मंडळाचीं कामें वगैरे नियम पाहाः— ६(८), २९ ते ३४, ३८, ४५, ४७, ४८, ४९, ५२, ५४, ५५].

१५. **संपादकमंडळाची निवडणूकः—** परिषदेच्या साहित्यपत्रिकेशिवाय इतर संपादकीय कार्यासाठी नियामक मंडळाने संमेलनानंतर लगेच भरणाऱ्या आपल्या सभेमध्ये जास्तींत जास्त पांच सभासदांचें एक संपादकमंडळ निवडावें व संपादक या मंडळाचा चिटणीस असावा.

[संपादक मंडळाचीं कामें वगैरे नियम पाहाः— ४२].

१६. **परिषदेची वार्षिक साधारण सभाः—** १. महाराष्ट्र-साहित्य-परिषदेची वार्षिक साधारण सभा वर्ष संपल्यापासून तीन महिन्यांच्या आंत भरविली पाहिजे.

२. ही वा. सा. सभा (अ) या सभेसाठी अन्यत्र दिलेल्या नियमान्वयें निश्चित केलेल्या निमंत्रित स्थळीं किंवा (आ) म. सा. प. च्या मुख्य कचेरीच्या गांवीं भरेल.

३. वर (२अ) दर्शविलेल्या स्थळीं वरील (१) प्रमाणे दिलेल्या मुदतीच्या आंत ही सभा भरविणेस अडचण अुद्भवल्यास कार्यकारी मंडळाने नियामक मंडळाची विशेष सभा

बोलवावी. नियामक मंडळाने आणखी अेक महिन्याचे आंत म्हणजे वर्ष संपून चार महिने पूर्ण होणेचे आंत वरील (२) प्रमाणे ही सभा भरविणेची तजवीज करावी. याप्रमाणे भरविलेल्या सभेंत खाली (५) मधील नमूद केलेलें कारभारी कामच फक्त करण्यांत येअील आणि अुर्वरित जो साहित्यविभाग तो मागाहून भरवून म. सा. संमेलनाचें अधिवेशन पूर्ण करण्याच्या प्रश्नाचा निर्णय सदरील नियामक मंडळानेच करावा.

४. वा. सा. सभेचे पुढे दिल्याप्रमाणे दोन मुख्य विभाग राहतील:– **१ कारभारी सभा, २ साहित्यसभा.** (या विभागांत चर्चा, प्रवचनें, नाट्यप्रयोग, काव्यगायनें अित्यादि विविध अंगांचाहि समावेश होतो.) या दोन मुख्य विभागांनी युक्त असलेल्या वा. सा. सभेसच 'म. सा. संमेलन' असें नांव राहील.

**५. कारभारी सभा:–** १. या सभेंत म. सा. प.चें गतवर्षाचें कार्यवृत्त, २. गतवर्षाचे रीतसर तपासून घेतलेले हिशेब, ३. पुढील वर्षाचें अंदाजपत्रक, ४. हिशेबतपासनीसांची निवडणूक, ५. घटनेंत करावयाच्या दुरुस्त्या-पुरत्या, ६. पोटसमित्यांची व विशेष समित्यांची नेमणूक, ७. सेवकवर्ग, जिंदगी वगैरे कारभारासंबंधीचे प्रश्न, नवीन योजना किंवा ठराव अित्यादि सर्व प्रकारचे विषय रीतसर लेखी पूर्वसूचना देअून ठेवण्यांत येतील. याशिवाय कार्यकारी मंडळ, नियामक मंडळ किंवा सभासद यांजकडून आलेले ठराव, अध्यक्षांच्या परवानगीने आयत्या वेळीं आलेले विषय, साहित्यसभेकडून आलेले ठराव यांचाहि या सभेंत विचार होअील.

**६. साहित्यसभा:–** या विभागाचें स्वरूप प्रतिवर्षी नियामक मंडळाने ठरवून द्यावें.

साहित्यसभेंत म. सा. प. च्या अुद्देशकक्षेंत येणाऱ्या कोणत्याहि विषयासंबंधीचे ठराव म. सा. प. कडे शिफारसरूपाने मंजूर करतां येतील. हे ठराव म. सा. प. च्या वा. सा. सभेच्या कारभारी सभेपुढे मंजुरीसाठी सादर करण्यांत येतील. या कारभारी सभेंत संमत झालेले ठरावच म. सा. संमेलनाचे ठराव समजले जातील. (वा. सा. सभा इतर नियम ४३ ते ४६).

**१७. परिषदेची विशेष साधारण सभा:—** याशिवाय जरूर लागेल तेव्हा अध्यक्षांनी अथवा कार्यकारी मंडळाने परिषदेची विशेष साधारण सभा बोलवावी. [अितर नियम २२, ५१ पाहा.]

**१८. गणसंख्या:—** परिषदेच्या सभांस अेकूण सभासदांच्या $\frac{१}{२५}$ किंवा ५० यांपैकी कमी असेल ती संख्या ही गणसंख्या मानली जाअील. गणसंख्येच्या अभावीं तहकूब राहिलेली सभा त्याच दिवशीं व त्याच ठिकाणीं पहिल्या सभेच्या वेळेपासून अेक तासाचे अवधीनंतर भरेल. अशा सभेंत कार्यक्रमपत्रिकेवर असलेल्या प्रश्नांचाच फक्त विचार करतां येअील.

**१९. पोटमंडळें:—** परिषदेचे अुद्देश सिद्धीस नेण्याकरिता किंवा दुसऱ्या कोणत्याहि विशिष्ट कार्याकरिता जरूर वाटल्यास एक किंवा अनेक पोटसमित्या किंवा विशिष्ट मंडळें नेमण्याचा अधिकार परिषदेच्या साधारण सभेस आहे.

**२०. ठराव, सूचना अित्यादि:—** (अ) म. सा. परिषदेचा वार्षिक अहवाल व हिशेब वार्षिक सभेच्या आधी निदान पंधरा दिवस चिटणीसांनी प्रत्येक सभासदाकडे पाठवावे. कोणाहि सभासदास अहवाल अथवा हिशेब यासंबंधी वार्षिक सभेंत ठराव मांडणें असल्यास त्याने ठरावाची लेखी सूचना सभेच्या अगोदर सात दिवस कार्याध्यक्षांस पाठविली पाहिजे.

(आ) वा.सा.सभेपुढे यावयाचे ठराव वा.सा.सभेपूर्वी अेक महिना कार्यालयाकडे आले पाहिजेत.

**२१. सभेची सूचना:—** परिषदेच्या कोणत्याहि सभेची सूचना सभासदांकडे सभेच्या दिवसापूर्वी निदान पंधरा दिवस चिटणीसांनी पाठवावी.

**२२. मागणी सभा:—** परिषदेचा मताधिकार असलेल्या पन्नास सभासदांनी लेखी मागणी केल्यास परिषदेची विशेष सभा अध्यक्षांनी बोलवावी. मागणीचें रीतसर पत्र त्यांस पोहोचल्यापासून

दोन महिन्यांच्या आंत ही सभा अध्यक्षांनी बोलाविली पाहिजे; न बोलावली तर सदर मागणी करणाऱ्या सभासदांनी तीन प्रमुख मराठी वर्तमानपत्रांतून आपल्या सह्यांच्या निमंत्रणपत्राने सभा बोलवावी. अशा सभेंत मागणीपत्रांत लिहिलेल्या कामाव्यतिरिक्त दुसरें काम करतां येणार नाही.

२३. **अध्यक्षः**—परिषदेच्या व नियामक मंडळाच्या कोणत्याहि सभेंत परिषदेचे अध्यक्ष हेच अध्यक्ष होतील; अध्यक्ष हजर नसल्यास हजर असलेल्या अुपाध्यक्षांपैकी अेक अुपाध्यक्ष सभेचा अध्यक्ष म्हणून निवडावे. कोणीहि अुपाध्यक्ष हजर नसल्यास सभेने खजीनदार, चिटणीस व निधिधारक यांखेरीज अितर कोणाहि सभासदास त्या सभेपुरता अध्यक्ष निवडावा.

२४. **नियामक मंडळाचीं कामें**:—(१) नियामक मंडळाचीं कामें सर्वसाधारणपणें खालीलप्रमाणे आहेतः—

(अ) परिषदेचे मूलभूत अुद्देश व तिच्या साधारण सभेचे ठराव यांस अनुसरून कार्याची दिशा ठरविणें, कार्यकारी मंडळ निवडणें व त्याच्या कामावर देखरेख ठेवणें.

(आ) कार्यकारी मंडळाने तयार केलेलें वार्षिक अंदाजपत्रक योग्य वाटतील ते फेरफार करून मंजूर करणें.

(अि) कार्यकारी मंडळाने तयार केलेला वार्षिक अहवाल व हिशेब विचारांत घेअून ते मंजूर करणें.

(अी) वार्षिक सभेपुढे मांडावयाच्या प्रश्नांचा विचार करणें.

(२) वा. सा. सभेनंतर लगेच त्याच ठिकाणीं नियामक मंडळाची अेक सभा भरेल. या सभेंत वा. सा. सभेने मंजूर केलेल्या ठरावाच्या अंमलबजावणीची योजना, पोटसमित्यांची निवड, पुढील कार्याची रूपरेषा ठरविणें वगैरे कामें केलीं जातील.

२५. **नि. मं. ची जादा सभाः**—याशिवाय अध्यक्ष किंवा कार्यकारी मंडळ यांस नियामक मंडळाची जादा सभा बोलविण्याचा अधिकार राहील.

२६. **नि. मं. सभेची सूचनाः**— नियामक मंडळाच्या कोणत्याहि सभेची सूचना सभासदांकडे सभेच्या दिवसापूर्वी निदान पंधरा दिवस चिटणीसांनी पाठवावी.

२७. **नि. मं. ची गणसंख्याः**—नियामक मंडळाच्या सभेस २० ही गणसंख्या राहील. गणसंख्येच्या अभावीं तहकूब राहिलेली सभा त्याच दिवशीं, त्याच ठिकाणीं पहिल्या सभेच्या वेळेपासून अेक तासाचे अवधीनंतर भरेल. अशा सभेंत कार्यक्रमपत्रिकेवर असलेल्या प्रश्नांचाच फक्त विचार करतां येअील. [३३ आ नियम पाहा.]

२८. **नि. मं. ची मागणी सभाः**— नियामक मंडळाच्या अस्तित्वांत असलेल्या सभासदांपैकी एकपंचमांश सभासदांनी विशिष्ट कारण दर्शवून सभेची लेखी मागणी केल्यास तशी सभा चिटणीसांनी पंधरा दिवसांच्या आंत बोलाविली पाहिजे. अशा सभेंत मागणीपत्रांत लिहिलेल्या कामाव्यतिरिक्त दुसरें काम करतां येणार नाही.

२९. **कार्यकारी मंडळाचीं कामें**:— कार्यकारी मंडळाचीं कामें सर्वसाधारणपणें खालीलप्रमाणे राहतील:—

परिषदेच्या नियमाप्रमाणे साधारण सभा भरविण्याची व्यवस्था करणें; महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका चालविणें; साधारण सभेने केलेल्या ठरावांची अंमलबजावणी करणें; परिषदेमार्फत होणाऱ्या प्रकाशनाची व्यवस्था करणें; वार्षिक अहवाल, हिशेब, अंदाजपत्रक हीं तयार करून नियामक मंडळापुढे मंजुरीकरिता मांडणें; परिषदेच्या कार्याकरिता द्रव्यनिधि जमविणें; उपकर्ते, आश्रयदाते वगैरे मिळविणें; नियमानुसार निधींची व्यवस्था करणें; शाखासभा स्थापन करणें; संलग्न संस्था नोंदविणें; नियामक मंडळाच्या निवडणुकीची व्यवस्था करणें; परिषदेच्या मूलभूत उद्देशांस धरून व ठरावांस विरोधक नसतील असे जरूर वाटतील ते उपाय योजणें; उद्देशांत व ठरावांत दर्शविलेल्या गोष्टी घडवून

आणण्यासाठी झटणें व चळवळ करणें; वेळोवेळीं उत्पन्न होणाऱ्या किंवा उत्पन्न होणें संभवनीय असलेल्या महत्त्वाच्या प्रश्नांबद्दल मराठी भाषा बोलणाऱ्या समाजांत जागृति करून तशा प्रश्नांसंबंधी परिषदेचें धोरण ठरविण्यास साहाय्यभूत होतील असे निबंध, ठराव वगैरे परिषदेपुढे आणण्याची व्यवस्था करणें; परिषदेचे उद्देश सिद्धीस नेण्यासाठी इतर जरूर ते प्रयत्न करणें; परिषदेकडे आलेल्या सर्व पैशांचा विनियोग अंदाजपत्रकाबरहुकूम करणें; नियामक मंडळ व सर्वसाधारण सभा नेमून देईल तीं सर्व कार्यें वेळोवेळीं पार पाडणें; परिषदेचें दप्तर संभाळणें आणि सोपविलेल्या जिंदगीचें रक्षण करणें. [कार्यकारी मंडळ निवडणूक नियम १४ पाहा]

३०. का.मं.ची सभा:— कार्यकारी मंडळाची सभादर तिमाहींत निदान एकदा तरी व्हावी.

३१. का. मं. सभेची सूचना:— (अ) कार्यकारी मंडळाच्या सभेची सूचना निदान सात दिवस आगाऊ दिली पाहिजे.

(आ) कार्यकारी मंडळाच्या व पोटसमितीच्या सभांच्या सूचना व वृत्तान्त अध्यक्षांकडे पाठविले पाहिजेत.

३२. का. मं. ची मागणी सभा:— कार्यकारी मंडळाच्या पांच सभासदांनी विशिष्ट कामाकरिता लेखी मागणी केल्यास तशी सभा चिटणीसांनी भरविली पाहिजे, आणि सभासदांस तिची सूचना चार दिवस पूर्वी दिली पाहिजे. चिटणीसांनी सभा न भरविल्यास मागणी करणारांनी कार्यकारी मंडळाच्या सर्व सभासदांस चार दिवसांची लेखी सूचना देऊन तशी सभा त्या कामाकरिता भरवावी. त्या कामाबाबतचे या सभेचे ठराव कार्यकारी मंडळाला बंधनकारक राहतील.

३३. का. मं. ची गणसंख्या:— (अ) कार्यकारी मंडळाच्या सभेस पांच सभासदांची गणसंख्या मानली जाईल.

(आ) गणसंख्येच्या अभावीं तहकूब राहिलेल्या सभेला गणसंख्येची जरुरी नाही.

३४. जरुरीची कार्यमंजुरी:— कार्यकारी मंडळाची सभा बोलावण्यास सवड नसेल तेव्हा जरुरीचीं कामें सभासदांचे लेखी अभिप्राय मागवून करतां येतील. त्यानंतर होणाऱ्या कार्यकारी मंडळाच्या सभेला असें झालेलें कार्य कळविलें पाहिजे; मात्र कार्यकारी मंडळाच्या एकचतुर्थांश सभासदांनी लेखी अभिप्रायांनी काम करण्यास असंमति लिहून कळविली तर त्या कामासाठी सभा बोलाविली पाहिजे.

३५. द्रव्यनिधि व खर्च:— वर्गण्या, देणग्या, बाकी रकमा वगैरे वसूल करण्याचें व पावत्या देण्याचें काम चिटणीसांचें आहे. अशा वसुलींतून किरकोळ खर्चाकरिता ५० रुपयेपर्यंतची रकम स्वत:जवळ ठेवून बाकीच्या वसूल झालेल्या रकमा चिटणीसाने खजीनदाराकडे जमा कराव्या व खर्चाकरिता मंजुरी असेल त्याप्रमाणे मंजूर केलेल्या रकमा वेळोवेळीं खजीनदाराकडून मागवून घ्याव्या आणि अंदाजपत्रकानुसार किंवा कार्यकारी मंडळाच्या ठरावानुसार खजीनदाराने त्या चिटणीसास द्याव्या.

३६. द्रव्यनिधीचे प्रकार:— परिषदेच्या द्रव्यनिधीचे चार वर्ग असतील:-(१) निधिधारकांकडे असलेला पैसा, (२) उपकर्ते, आश्रयदाते, साहाय्यक, हितचिंतक व तहह्यात सभासद यांच्या वर्गण्या (सदरहू रकम कायम निधि म्हणून समजण्यांत येईल), (३) साधारण सभासद, संलग्न व सहकारी संस्था यांच्या वर्गण्या, किरकोळ देणग्या व इतर उत्पन्न, आणि (४) विशेष कार्याकरिता दिलेल्या देणग्या किंवा वर्ग २ ते ४ या सभासदांनी विशेष कार्याकरिता दिलेल्या वर्गण्या, पारितोषिक वगैरे रकमा. यांपैकी दुसऱ्या वर्गांतील रकमा निधिधारकांकडे कायम निधींत जमा होतील. तिसऱ्या वर्गांतील रकमा व पहिल्या वर्गांतील रकमेवरील व्याज किंवा नफा खजीनदारांकडे भरून नित्य व नैमित्तिक खर्चाकडे लावण्यांत येईल. चवथ्या वर्गांतील रकमा, होतां होईल तों, दात्यांच्या इच्छेप्रमाणे व शर्तींप्रमाणे खर्च कराव्या. कोणत्याहि वर्षीं जमा होणाऱ्या दुसऱ्या वर्गांतील वर्गणीपैकी निम्म्या वर्गणीइतकी रकम नियामक मंडळाला त्या वर्षाच्या चालू खर्चासाठी मंजूर करण्याचा अधिकार आहे.

३७. कायम निधीची व्यवस्था:— कायम निधि व स्थावर मिळकत निधिधारकांच्या नावें

असावी व त्यांच्याच ताब्यांत राहावी. कायम निधिव्यतिरिक्त सर्व पैसा खजीनदाराकडे राहावा. वसूल झालेल्या सर्व रकमा चिटणीसांनी वरील ३५ व ३६ या नियमांना अनुसरून खजीनदार व निधिधारक यांच्याकडे जमा कराव्या. वार्षिक अहवाल व हिशेब तयार करण्याच्या वेळीं निधिधारकांनी कायमनिधीचा व आपल्या ताब्यांतील मालमत्तेचा वार्षिक हिशेब कार्यकारी मंडळाला द्यावा.

**३८. विश्वस्तत्व रद्द करणें:**— परिषदेने अविश्वासदर्शक ठराव पास केल्यास ट्रस्टींनी आपल्या अधिकाराचा राजीनामा देऊन आपल्या ताब्यांतील परिषदेची सर्व मालमत्ता व द्रव्यनिधि कार्यकारी मंडळाच्या स्वाधीन केला पाहिजे. तसेंच द्रव्यनिधि किंवा मालमत्ता यांबद्दल ट्रस्टी व कार्यकारी मंडळ यांच्यामध्ये मतभेद उत्पन्न झाल्यास परिषदेचें बहुमत उभय पक्षांनी मान्य केलें पाहिजे. वार्षिक अहवालाच्या वेळीं ट्रस्टींनी आपल्या ताब्यांतील मालमत्तेचा अहवाल चिटणीसांकडे पाठवावा. हा ठराव ट्रस्टी व समासद यांस पूर्वसूचना दिल्याशिवाय विचारांत घेऊं नये. असल्या ठरावास तीनपंचमांस बहुमताचें बंधन असावें.

**३९. ठराव बंधन:**— परिषदेच्या निधिधारणाबाबत इंडियन ट्रस्ट ॲक्ट, सोसायटीज रजिस्ट्रेशन ॲक्ट, व परिषदेचें ट्रस्टडीड यांस अविरोधी असे परिषदेच्या साधारण सभेचे सर्व ठराव ट्रस्टींवर बंधनकारक राहतील.

**४०. नवीन विश्वस्तपत्र:**— १।१।३७ पासून जी घटना अमलांत आली, त्यानंतर परिषदेकडे येणाऱ्या रकमा व मिळकत यांबाबत नवें ट्रस्टडीड व नियम परिषदेने करावे.

**४१. बँकखातें व हिशेब:**— कायम निधीवरील वार्षिक व्याज, साधारण सभासदांच्या वर्गण्या, तसेंच किरकोळ देणग्या या रकमा परिषदेच्या नांवाने बँकेंत जमा राहतील. बँकेंतील जमेपैकीं रकमा काढावयाच्या असल्यास त्या खजीनदार व अध्यक्ष किंवा चिटणीस यांपैकीं एक अशा दोघांच्या सह्यांनी काढतां येतील अशी व्यवस्था करावी.

**४२. संपादकमंडळाचीं कामें:**—(अ) साहित्य परिषदेच्या कार्यासंबंधाचा मजकूर चिटणिसांकडून येईल तो संपादकाने पत्रिकेमध्ये दाखल केला पाहिजे. पत्रिकेच्या सर्वसामान्य धोरणासंबंधी कार्यकारी मंडळाचे ठराव संपादकावर व संपादकमंडळावर बंधनकारक असतील.

(आ) नियम ३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे निरनिराळ्या विषयांवर ग्रंथ तयार करण्याची योजना करणें; तसेंच बाहेरून येणारे ग्रंथ तपासून त्यांसंबंधी कार्यकारी मंडळास सल्ला देणें.

(इ) याशिवाय कार्यकारी मंडळाच्या सल्ल्याने परिषदेचे उद्देश साध्य करण्यासाठी जरूर तें कार्य करणें. [संपादकमंडळ निवडणूक नियम १५ पाहा.]

**४३. वार्षिक साधारण सभा आमंत्रण:**— [वा. सा. सभा नियम १६ पाहा.] (अ) परिषदेच्या शाखासभेने किंवा शाखासभा नसल्यास संलग्न संस्थेने ज्या ठिकाणीं आमंत्रण दिलें असेल तेथे परिषदेची वा. सा. सभा भरेल.

(आ) वा. सा. सभेस आमंत्रण देऊं इच्छिणाऱ्या संस्थेने पुढील वर्षाच्या बैठकीसाठी द्यावयाचें आमंत्रण चालू वर्षाच्या बैठकीपूर्वीं निदान अेक महिना आधी म. सा. पं. च्या कचेरीकडे पाठविलें पाहिजे. याप्रमाणे आलेल्या सर्व आमंत्रणांचा विचार वा. सा. सभेच्या कारभारी मंडळांत होअून ज्या ठिकाणचें आमंत्रण बहुमताने स्वीकारलें जाईल तेथे वा. सा. सभेची पुढील बैठक भरेल.

**४४. स्वागतमंडळ बनविणें वगैरे:**— निमंत्रक संस्थेने वा. सा. सभेपूर्वी निदान चार महिने स्वागतमंडळ बनवावें, आणि स्वागतमंडळाच्या पदाधिकाऱ्यांची निवडणूक करावी. या निवडणुकीनंतर वा. सा सभेसंबंधीच्या सर्व स्थानिक व्यवस्था व सोयी करण्याचीं व नियमान्वयें स्वागतमंडळावर सोंपविलेलीं सर्व कामें पार पाडण्याची जबाबदारी स्वागतमंडळावर राहील. स्वागतमंडळाचे पदाधिकारी निवडले जाईपावेतो निमंत्रक संस्थेचे पदाधिकारी तात्पुरते अधिकारी म्हणून काम करतील. येणेंप्रमाणे करण्याचीं सर्व कामें स्वागतमंडळाने कार्यकारी मंडळाच्या संमतीने करावयाचीं आहेत.

४५. परिषदेने स्वागतमंडळास द्यावयाचें सहकार्यः— (अ) वा. सा. सभेला हजर राहणाऱ्या म. सा. प. च्या समासदामागे दरडोई दोन रुपयेप्रमाणे देणगी म. सा. प. कडून स्वागतमंडळास देण्यांत यावी.

(आ) निमंत्रित स्थळीं वा. सा. सभेच्या बैठकीच्या पूर्वतयारीच्या व सिद्धतेच्या कामीं मार्गदर्शन करण्यासाठी म. सा. प. च्या का. मं. ने आपले नियुक्त प्रतिनिधि पाठवून स्वा. मं. ला साहाय्य करावें. स्वा. मं. ने या प्रतिनिधींस सर्व प्रकारची माहिती पुरवून त्यांच्या सल्ल्याप्रमाणे काम केलें पाहिजे. तसेंच अिष्ट वाटेल त्या वेळीं स्वा. मं. ला म. सा. प. च्या का. मं. कडे साहाय्य व सल्ला देण्यासाठी नियुक्त प्रतिनिधि पाठविण्याची मागणी करतां येअील. अशी मागणी आल्यापासून आठ दिवसांत प्रतिनिधि पाठविण्याची व्यवस्था का. मं. ने करावी.

४६. वा. सा. सभेंतील साहित्यविभागविषयकः— [वा. सा. सभा नियम १६ पाहा.]

१ प्रतिनिधित्वः—(अ) म. सा. प. चे अुद्देश मान्य असणाऱ्या अठरा वर्षांवरील कोणाहि पुरुषास अगर स्त्रीस वा. सा. सभेच्या साहित्यविभागाच्या कार्यक्रमांत त्या वेळच्या बैठकीसाठी केलेल्या नियमांस लेखी मान्यता देअून व त्यासाठी ठरलेला आकार देअून मतदार प्रतिनिधि म्हणून भाग घेतां येअील. अितरांना फक्त निमंत्रित पाहुणे किंवा प्रेक्षक म्हणून बैठकीसाठी केलेल्या नियमाप्रमाणे त्या कार्यक्रमांत भाग घेतां येअील.

(आ) म. सा. प. चे सर्व सभासद साहित्यविभागाच्या कार्यक्रमांत मतदार प्रतिनिधि म्हणून समजले जातील.

२ उपविभागः— साहित्यविभागाचे अनेक अुपविभाग जरूरीप्रमाणे केले जातील व ते नियामक मंडळ नियमान्वयें ठरवील.

३ उपविभाग अध्यक्षः— साहित्यसभेंतील प्रत्येक अुपविभागाच्या कामासाठी अेकेक अध्यक्ष अन्यत्र दिलेल्या नियमान्वयें नियोजित करण्यांत येअील, व त्या त्या नियोजित अध्यक्षाच्या अध्यक्षतेखाली त्या त्या अुपविभागाचें काम चालेल.

४ सा. वि. अध्यक्ष निवडणूक— (अ) वर नियम ३६ मध्ये निर्दिष्ट केलेल्या अध्यक्षांची निवडणूक पुढे दिल्याप्रमाणे करण्यांत येईल. म. सा. प. शाखासभा व म. सा. प. च्या संलग्न संस्था व स्वागतमंडळ यांच्या कार्यकारी मंडळाकडून बैठकीच्या दिवसापूर्वी तीन महिने आधी येऊन पोहोंचतील अशा बेताने आणि पाठविणाऱ्या संस्थांस निदान पंधरा दिवसांची मुदत राहील अशा बेताने स्वागतमंडळाच्या कार्यकारी मंडळाने प्रत्येक अुपविभागासाठी अध्यक्षांचीं तीनपर्यंत नांवें सूचित म्हणून मागविलीं पाहिजेत.

(आ) वरीलप्रमाणे निरनिराळया विभागांच्या अध्यक्षपदासाठी आलेल्या सूचित नांवांची मतपत्रिका तयार करून म. सा. परिषद्, तिच्या शाखासभा, तिच्या संलग्न संस्था आणि स्वागतमंडळाचे सर्व मतदार सभासद यांजकडे मताकरिता पाठविली जाअील. सर्वांत अधिक मतें मिळतील तो तो अुमेदवार त्या त्या विभागाचा अध्यक्ष निवडला गेला असें मानलें जाईल.

टीपः— म. सा. परिषद्, शाखासभा व संलग्न संस्था यांच्या कार्यकारी मंडळांना निरनिराळया विभागांसाठी आलेल्या सूचित नांवांतून एकच नांव निवडण्याचा अधिकार आहे.

५ ठरावः— (अ) वा. सा. सभेच्या साहित्यविभागांत म. सा. प. च्या अुद्देशकक्षेंत येणाऱ्या कोणत्याहि विषयासंबंधीचेच ठराव मांडतां येतील. म. सा. परिषद्, शाखासभा, संलग्न संस्था व त्या वेळपर्यंत नोंदलेले प्रतिनिधि यांनाच फक्त हे ठराव पाठविण्याचा अधिकार आहे. असे ठराव वा. सा. सभेच्या बैठकीपूर्वी निदान एक महिना स्वागतमंडळाकडे आले पाहिजेत.

(आ) पाठवावयाचे ठराव साहित्यसभेच्या कोणत्या विभागासाठी सुचविले आहेत तें पाठविणाराने त्या ठरावावर स्पष्ट दिग्दर्शित केले पाहिजेत. येणेंप्रमाणे आलेल्या ठरावांची विभागाप्रमाणे

विभागणी करून त्या ठरावाची एक प्रत त्या त्या विभागाच्या अध्यक्षाकडे निदान पंधरा दिवस आधी स्वागतमंडळाने अवलोकनार्थ पाठवावी. त्याचप्रमाणे सर्व ठरावांची एकेक प्रत म. सा. प. च्या अध्यक्षांकडे पंधरा दिवस आधी पाठवावी.

६ **विषयनियामक मंडळः**— (अ) साहित्यविभागापुढे यावयाचे ठराव व सूचना विषयनियामक मंडळापुढे आलीं पाहिजेत.

(आ) विषयनियामक मंडळाचे घटक पुढीलप्रमाणे असतील:—

१. म. सा. प.चे भूतपूर्व अध्यक्ष, २. म. सा. सं. चे भूतपूर्व अध्यक्ष, ३. त्या अधिवेशनांचे स्वागताध्यक्ष, ४. साहित्यसभेच्या अुपविभागांचे त्या वेळचे अध्यक्ष, ५. म.सा.प.च्या नियामक मंडळाचे समासद, ६. म. सा. प. च्या शाखासभा व संलग्न संस्था यांजकडून प्रत्येकी एक प्रमाणे यावयाचे प्रतिनिधि, ७. स्वागतमंडळाने नेमून दिलेले पंचवीसपर्यंत प्रतिनिधि, ८. अुपस्थित असलेल्या प्रतिनिधीं-तून प्रत्येक म. सा. प. च्या प्रादेशिक विभागांप्रमाणे त्या त्या प्रतिनिधींनी निवडून दिलेले प्रतिनिधि.

**टीपः**— ही निवडणूक पुढीलप्रमाणे होओील. प्रत्येक प्रादेशिक विभागांतील अुपस्थित प्रति-निधींच्या संख्येतील पहिल्या दहापर्यंत अेक प्रतिनिधि. दहाहून अधिक सभासद अुपस्थित असल्यास प्रत्येक पूर्ण दहा संख्येच्या हजर असलेल्या सभासदांच्या मागे आणखी अेक.

येणेंप्रमाणे विषयनियामक मंडळ सिद्ध करण्यांत यावें.

(अि) विषयनियामक मंडळाचें काम वा. सा. समेच्या अध्यक्षाने लावून दिलेल्या क्रमाप्रमाणे त्या त्या विभागाच्या अध्यक्षांच्या अध्यक्षतेखाली चालेल. हीं कामें केव्हा व कशीं चालावीं हें वा. सा. सभेचे अध्यक्ष ठरवितील. त्याचप्रमाणे सर्वसाधारण स्वरूपाच्या ठरावांच्या विचारासाठी विषय-नियामक मंडळाच्या सभेची बैठक भरविण्याची व्यवस्था वा. सा. स. चे अध्यक्ष करतील व त्यांच्याच अध्यक्षतेखाली ही बैठक चालेल.

(अी) विषयनियामक मंडळांत तीनपंचमांश मतांनी नामंजूर झालेला ठराव किंवा अुपसूचना त्या त्या विभागाच्या खुल्या अधिवेशनापुढे येअूं शकणार नाही. परंतु तीनपंचमांशाहून कमी बहु-मताने नामंजूर झालेले ठराव किंवा अुपसूचना खुल्या अधिवेशनापुढे मांडावयाच्या असल्यास विषय-नियामक मंडळांतील वीस सभासदांच्या किंवा साहित्यसभेच्या चाळीस प्रतिनिधींच्या सह्यांनिशी तशी लेखी सूचना मंडळाच्या त्या बैठकीनंतर होणाऱ्या खुल्या अधिवेशनाच्या सुरवातीला अध्यक्षांकडे आल्यास ती खुल्या अधिवेशनांत सादर केली जाअील.

(अु) खुल्या अधिवेशनापुढे यावयाचे ठराव व त्यांचे सूचक व अनुमोदक मुकर करणें अित्यादि कामें करण्याचा अधिकार विषयनियामक मंडळाकडे राहील.

७ **ठराव मंजुरीः**— साहित्यविभागांत मंजूर झालेल्या ठरावांची अधिकृत प्रत त्या त्या विभागांच्या अध्यक्षांच्या सहीने लगेच म. सा. प. च्या चिटणीसांकडे त्या त्या विभागांच्या अध्यक्षांनी पाठविली पाहिजे. हे सर्व ठराव वा. सा. सभेच्या कारभारी सभेला सादर करण्यांत येतील व कार-भारी सभेंत मंजूर झालेले ठरावच म. सा. संमेलनाचे ठराव समजले जातील.

८ **प्रास्ताविक कामः**— साहित्यसभेचें प्रास्ताविक काम वा. सा. सभेच्या अध्यक्षांच्या अध्य-क्षतेखाली सुरू होअील. याच सा. सभेच्या प्रारंभींच्या बैठकींत अुपविभागांच्या अध्यक्षांचीं भाषणें होतील. त्या भाषणांचा क्रम वा. सा. सभेचे अध्यक्ष लावून देतील. हें प्रास्ताविक काम संपल्यावर नियोजित विभागांचे अध्यक्ष स्थानापन्न होअून पुढील काम त्यांच्या अध्यक्षतेखाली चालेल.

९ **विषयनियामक मंडळाची संयुक्त बैठकः**— आवश्यक वाटल्यास अुपविभागांची व अुपविभागांच्या विषयनियामक मंडळाची संयुक्त बैठक भरविण्याचा अधिकार वा. सा. सभेच्या अध्यक्षांस आहे. या संयुक्त बैठकींत वा. सा. सभेचे अध्यक्ष हेच अध्यक्ष राहतील.

१० **अध्यक्षीय निर्णयः**— (अ) वा. सा. सभेच्या कोणत्याहि कामकाजासंबंधाने कसलीहि

अडचण अुत्पन्न झाल्यास किंवा कोणत्याहि नियमांच्या अर्थासंबंधी अगर कामाच्या व्यवस्थेसंबंधी प्रश्न अुद्‌भवल्यास म. सा. प. च्या अध्यक्षांचा निर्णय बंधनकारक समजण्यांत येअील.

(आ) कोणत्याहि बैठकीपुढे आलेल्या सर्व ठरावांचा निकाल अुपस्थित प्रतिनिधींच्या बहुमताने होअील. अेखाद्या ठरावावर दोन्ही बाजूंस सारखीं मतें पडल्यास त्याचा निकाल बैठकीच्या अध्यक्षांच्या निर्णायक मताने होअील.

**११ अितिवृत्त, हिशेब वगैरेः--** (अ) साहित्यसभेच्या बैठकीचें काम संपल्यावर व तत्संबंधी अितिवृत्त व हिशेब पुरे झाल्यावर साहित्यसभेचें सर्व दप्तर स्वागतमंडळाने म. सा. प. कडे पाठवावें.

(आ) वा. सा. सभेच्या अधिवेशनानंतर सहा महिन्यांच्या आंत सा. सभेचा वृत्तान्त तयार करून अधिवेशनाच्या सर्व प्रतिनिधींकडे पाठविण्याची व्यवस्था स्वा. मं. ने करावी. सदरील वृत्तान्त छापून वांटण्यासंबंधाचा सर्व खर्च करण्याची जबाबदारी स्वागतमंडळावर राहील.

(अि) स्वागतमंडळाकडे जमा झालेल्या रकमेंतून अधिवेशनाचा खर्च वजा केल्यानंतर कांही शिल्लक राहिल्यास तिचा अेकतृतीयांश मं. सा. प. ला व दोनतृतीयांश स्वागतमंडळाला अशी वांटणी व्हावी.

**४७. संलग्न व सहकारी संस्था मान्यताः—** (अ) महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे उद्देश मान्य असणाऱ्या व परिषदेच्या कार्याशीं सहानुभूति असणाऱ्या अशा वाङ्‌मयविषयक संस्था अनुक्रमें (१) संलग्न संस्था, किंवा (२) सहकारी संस्था म्हणून परिषदेशीं जोडून घेण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला राहील. ह्या दोन्ही तऱ्हेच्या सभा जोडून घेण्यासंबंधी अटी, नियम वगैरे करण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला आहे.

(आ) साहित्याच्या अुन्नतीसाठी स्थापन झालेल्या ज्या संस्थांना महाराष्ट्र-साहित्य-परिषदेचे हेतु व नियम मान्य असतील, व ज्यांचे हेतु परिषदेच्या हेतूंशीं विसंगत नसतील, अशा संस्थांना त्यांच्याकडून मागणी आल्यास संलग्न संस्था म्हणून जोडून घेण्यांत येईल.

(इ) संलग्न संस्थांनी नोंदणी-आकार पांच रुपये द्यावा व पुढे दरवर्षी तीन रुपये वर्गणी द्यावी.

(ई) प्रत्येक संलग्न संस्थेला परिषदेच्या अुद्देशांस अनुसरून कार्यकारी मंडळाला सूचना करण्याचा हक्क आहे व कार्यकारी मंडळाने त्यांचा विचार करून आपला निर्णय करावा.

(उ) महाराष्ट्र साहित्य-परिषदेच्या कार्याशीं सहानुभूति असणाऱ्या संस्था, त्यांनी तशी इच्छा प्रदर्शित केल्यास, परिषदेशीं सहकारी संस्था म्हणून जोडून घेण्याचा व त्यासंबंधी अटी वगैरे ठरविण्याचा अधिकार कार्यकारी मंडळाला आहे.

(ऊ) संलग्न व सहकारी संस्था नोंदून घेण्याचा अधिकार महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या कार्यकारी मंडळास आहे; मात्र अशा संस्था पटावरून कमी करणें झाल्यास त्यासंबंधीचा ठराव कार्यकारी मंडळाने नियामक मंडळाच्या सभेपुढे मंजुरीसाठी ठेवला पाहिजे.

(ऋ) संलग्न व सहकारी संस्थांची अंतर्गत व्यवस्था व आर्थिक परिस्थिति यांची जबाबदारी परिषदेवर कोणत्याहि प्रकारें राहणार नाही; मात्र प्रत्येक संलग्न संस्थेने आपला छापील अथवा हस्तलिखित वार्षिक अहवाल परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडे पाठवावा.

(ए) प्रत्येक संलग्न संस्थेने आपल्यातर्फें आगाअू नोंदलेला एक प्रतिनिधि परिषदेचा नियम ६(७) वर्गाचा त्या संस्थेतर्फें सभासद गणला जाईल.

(ऐ) साहित्यपत्रिकेची एक प्रत प्रत्येक संलग्न संस्थेस फुकट दिली जाईल.

**४८. शाखा सभा स्थापणें वगैरेः-** (१) नियम ३'आ' मध्ये सांगितल्याप्रमाणे निरनिराळ्या प्रादेशिक विभागाच्या मुख्य स्थानीं परिषदेच्या शाखासभा स्थापन करण्याचा प्रयत्न कार्यकारी मंडळाने करावा.

(२) त्या त्या प्रादेशिक विभागांतील परिषदेचे सभासद त्या शाखासभेचे सभासद राहतील. त्यांतील साधारण समासदांच्या वर्गणीपैकी एकतृतीयांश रक्कम परिषदेच्या कार्यकारी मंडळाकडून सभेस तिचें कार्य चालविण्याकरिता देण्यांत यावी.

(३) शाखासभेने आपल्या कार्याकरिता विशेष देणग्या वगैरे मिळविल्यास त्यांतील एकतृतीयांश भाग परिषदेच्या खर्चाकरिता म्हणून मुख्य कचेरीकडे पाठवावा.

(४) शाखासभेने नियुक्त केलेले दोन सभासद व कार्यकारी मंडळाचे दोन सभासद यांनी मिळून शाखासभेची घटना, परिषदेच्या घटनेस अविरोधी अशी, तयार करावी.

(५) शाखासभेने आपलें कार्य सर्वसाधारणपणें कार्यकारी मंडळाच्या देखरेखीखालीं करावें. कार्यकारी मंडळाने कांहीं विशिष्ट कार्यें तिजकडे सोपविल्यास तींहि करावीं आणि प्रादेशिक संमेलनें शक्य तों दरवर्षी भरविण्याचा प्रयत्न करावा.

(६) ज्या प्रादेशिक विभागांत शाखासभा असेल तेथील नियामक मंडळाच्या निवडणुकी शाखासभेनेच कराव्या. निवडणुकीबाबत तक्रार उपस्थित झाल्यास तिचा निकाल परिषदेच्या अध्यक्षांनी करावा व तो अखेरचा मानला जावा.

**४९. सभावृतान्त पुस्तकः–** परिषदेच्या नियामक मंडळाच्या, कार्यकारी मंडळाच्या, इतर व विशिष्ट समांच्या कामांची नोंद स्वतंत्र पुस्तकांत लिहून ती त्या त्या सभांच्या पुढील बैठकींत मंजूर झाली पाहिजे.

**५०. दप्तरः–** परिषदेचें सर्व दप्तर, पत्रव्यवहार व निरनिराळया सभांच्या वृत्तान्तांचीं पुस्तकें हीं सर्व सुरक्षित व व्यवस्थित ठेवण्याची जबाबदारी चिटणीसांवर राहील.

**५१. घटना बदलः—** (अ) परिषदेच्या घटनेंत फेरफार करणें झाल्यास तो एक महिन्याची पूर्वसूचना देऊन परिषदेच्या वार्षिक सभेंत किंवा त्यासाठी बोलाविलेल्या विशेष सभेंत हजर असून मतें देणाऱ्या समासदांच्या तीनपंचमांश बहुमताने करतां येईल. याशिवाय जेथे विशिष्ट बहुमताचा निर्देश केला नाहीं, अशा सर्व कामांचा विचार साध्या बहुमताने होईल.

(आ) साधारण सभेंत तीनपंचमांश बहुमताने जे ठराव मान्य होतील त्यांस कोणत्याहि तऱ्हेने विरोध येईल असे ठराव सहा महिनेपर्यंत पुढे आणले जाऊं नयेत.

(इ) कोणताहि ठराव मान्य झाल्यापासून तीन महिने पूर्ण होण्याच्या आंत त्या ठरावाला विरोधक असा दुसरा कोणताहि ठराव पुढे आणतां येणार नाहीं.

**५२. पोटनियमः—** परिषदेचीं कामें होण्याकरिता तिचे हेतु व नियम यांना अविरोधी असे पोटनियम कार्यकारी मंडळाने व नियामक मंडळाने जरूर वाटल्यास करावे; मात्र त्यांना परिषदेच्या पुढील साधारण सभेची संमति घेतली पाहिजे.

**५३. प्रकाशनः—** (अ) परिषदेने जे निबंध, लेख, पुस्तकें यांस इनाम दिलें असेल, किंवा त्यांच्या प्रकाशनाचा खर्च केला असेल, त्यांची निदान एकेक प्रत सभासदांस सवलतीच्या दराने मिळावी. हे दर कार्यकारी मंडळ ठरवील.

(आ) परिषदेच्या प्रत्येक समासदास साहित्यपत्रिकेची एक प्रत फुकट पाठविण्यांत येईल.

**५४. सभासदांची रिकामी जागा भरणेंः—** कार्यकारी मंडळ, नियामक मंडळ अथवा कोणतीहि समिति यांतील सभासदाची जागा कोणत्याहि कारणानें रिकामी असल्यास त्या मंडळाला किंवा समितीला बहुमताने परिषदेच्या सभासदांतून निवड करून ती जागा भरतां येईल.

**५५. मंडळांतील सभासदत्व रद्द करणेंः—** योग्य कारण न कळवितां नियामक मंडळ, कार्यकारी मंडळ व कोणतीहि पोटसमिति यांच्या तीन सभांस लागोपाठ अनुपस्थित राहणाऱ्या सभासदाचें त्या त्या समितीचें सभासदत्व रद्द झालें असें समजण्यांत यावें.

---

आर्यसंस्कृति मुद्रणालय, चिमणबाग, टिळक रस्ता, पुणें, येथें लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या कार्यालयांत परिषदेकरिता रामचंद्र श्रीपाद जोग यांनी प्रसिद्ध केलें.





